

॥ श्रीगणेशायनमः । श्रीगोपालकृष्णायनमः । श्रीगुरुभ्योनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय पांचवा

## कर्मसंन्यासयोग (देवताकांड)

**अर्जुन उवाच :**

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

[संन्यासं=कर्मत्याग. कर्मन्=कर्म. पुनर्=पुन्हः. शंम्=प्रशंसा करणें, स्तुति करणें. श्रेय यत्= जें श्रेयस्कर. एतयोः = ह्या दोहोंमध्यें. तत्=ते. मे=मला. ब्रूहि=बोलून सांगा. सुनिश्चितं=निश्चयत्वें-करून उत्तम असें जें असेल तें.]

**अन्वय :** कृष्ण! कर्मणां संन्यासं शंससि । पुनः च योगं शंससि । एतयोः एकं यत श्रेयः तत् मे सुनिश्चितम् ब्रूहि ।

**अर्थ :** श्रीकृष्णा, कर्माचें एकदां संन्यास व एकदां योग असें द्व्यर्थी वर्णन करितां. करितां ह्या दोहोंपैकीं म्हणजे कर्मसंन्यास व कर्मयोग यांपैकीं जें मजला श्रेयस्कर होईल तें निश्चितपणें सांगा (१).

**मग पार्थ कृष्णातें म्हणे । हां हो ऐसें तुमचें बोलणें ।**
**येक होय तरि अंतःकरणें । विचारूंये ॥ १ ॥**
**मागां सकळधर्माचा संन्यासु । तुम्हींच निरूपिला होता बहुवसु ।**
**तरि कर्मयोगि अति रसु । पोषितसां पुढती ॥ २ ॥**
**ऐसें द्वैतार्थ हें बोलतां । आम्हां नेणतयांचा चित्ता ।**
**आपुलिये चाडे श्रीअनंता । उमजु नोहे ॥ ३ ॥**
**आईकें येक सार तें बोधिजे । तरि येकनिष्ठाचि बोलिजे ।**
**हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥**
**तरि याचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनविलें होतें ।**
**जे हा परमार्थ ध्वनितें । न बोलावा ॥ ५ ॥**
**तरि मागिल असो देवा । आतां प्रस्तुत उकल देखावा ।**
**सांगें दोहिंमाजी बरवा । मार्ग कवण ॥ ६ ॥**
**जो परिणामिचा निर्वाळा । अचुंबित ये फळा ।**
**आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियाची ॥ ७ ॥**

ऐसें–हे कैसे : एक होय तरि अंतःकरणें विचारूंये = तादात्म्यतेचें असेल तर सुखदुःखादि ज्ञानाचें इंद्रिय जें मन त्याचे विचारास घेऊन पाहूं या. विचारूंये–विचारू ये (१). सकळा–सकळ. धर्मांचा–कर्मांचा. अति रसु–केवि अतिरसु = आग्रह : : पोषितसां–पोखीतसां = वाढविता : पुढती = पुन्हा (२). द्वैतार्थ–द्व्यर्थ = दोन अर्थांचे, दुहेरी, दुटप्पी : : उमजु–उमज = समज. आपुलिये चाडे = आमच्या बुद्धीनें (३). आईके–ऐके : येक सार तें–एकसाराते = एकच तत्त्व, तत्त्वांश, मुख्य भाग, गाभा (सार = अलंकारविशेष, उत्तरोत्तर वर्णनाधिक्य १८ ओवी ३४४, ३४५, ३४६, ३४७). एकनिष्ठाचि–एकनिष्ठचि = एकांताचे जसे, अनन्य असे : आणिकीं = पुन्हा, आणखी एकदां, दुसऱ्यांदा. (निष्ठ = युक्त, विशिष्ट, वाहिलेला, रत, सत्यनिष्ठ, धर्मनिष्ठ इ.... ) निष्ठा = अवस्था, कौशल्य, दृढभक्ति, श्रद्धा, सिद्धांत, निश्चय, याचना) (४). राउळासि = गुरुराव–राउळ, गुरुदेव–देऊळ–[गुरुदेवास–ज्ञानवंत, गुरुमहाराज, सद्गुरूंना : : (देव, अगार, आयतनं, कुलं, आलय = देऊळ) : देवखानं, देवखानकं = देवळाजवळचें तळें. देवजनविद्या = गीत, वाद्य, नृत्य, अत्तरें इत्यादींचें शास्त्र. देवदास = पुजारी. देवदासी = देवापुढें नाचणारी कलावंतीण (रान महाळुंग). देवानां प्रियः = बकरा, मूर्ख, संन्यासी : देवब्राह्मण = पुजारी]. ध्वनिते = ध्वनित जो त्यास संदिग्धत्वें, गूढार्थानें (५). तरी–परी : प्रस्तुत–प्रस्तुती = उपस्थित, चालु, आतांचें, बोलण्याचा चर्चेचा विषय, समय. उकल देखावा = स्पष्ट उलगडा करून देखणा करावा (६). परिणामिचा निर्वाळा = शेवटपर्यंत सिद्धतेचा निर्णय, निवाडा देणारा. अचुंबित ये फळा = सर्वतऱ्हेनें बिनचूक फळ देणारा. प्रांजळा अनुष्ठितां = आचरण्यास, अनुष्ठानास सुगम, सुलभ, स्पष्ट (७).

पार्थ श्रीकृष्णास म्हणतो आहे कीं, अहो, हें असें हें तुमचें कसलें तें बोलणें, जें का एक श्रेयाचें असेल तर तें अंतःकरणानें, मनानें सांगा. (१)

पूर्वीं सकळ कर्मांचें होणें, तें निष्कामतेनेंच कर्म करावें, असें तुम्हीं ठामपणें निरोपिलेंत, म्हटलात, व वर आतां कर्मयोगाबद्दलच अति–अति चांगुलपणाची पुष्टि देत आहात; कर्मयोगासंबंधींची गोडीच कीं वाढवित आहात. (२)

आम्हां नेणत्यांच्या चित्तास असें हें व्यर्थतेचें बोलणें बोलतां, आपल्या आवडीप्रमाणें पाहिजे तसा. श्रीअनंता, उमगेना, उमजेचना ! (३)

एका सारासच बोलावें, बोधाचें करावें, तर मग केव्हांहि एकनिष्ठ असेंच तें बोलणें व्हावें ना? यावर तुम्हांस आणखी तें कसें सांगावें? (४)

करितां याचसाठीं तुम्हा सद्गुरूंना विनवणी केली कीं, हा परमार्थ संक्षेपतः, संदिग्धपणें नच बोलावा. (५).

पण पूर्वीचें तें असो, अहो देवा, आतां प्रस्तुत प्रसंगीं उलगडा करून दाखवा कीं, दोन्हींमध्यें आचरण्यास सोयीचा असा मार्ग तो कोणता तें. (६)

जो परिणामीं सिद्ध असा अचुंबितपणेंच फळाचा व्हावा, फळास यावा व अनुष्ठानाचा केला तर तो स्पष्ट असावा त्याबरोबरच कीं, सोपा असाही असावा. (७)

**जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्ग तरी बहु सांडे ।**
**तैसें सोखासन सांगडें । सोहपें होये ॥ ८ ॥**

**येणें अर्जुनाचेनि बोलें । देव मनीं रिझले ।**
**मग होईल ऐसें म्हणितिलें । संतोषोनियां ॥ ९ ॥**

**देखां कामधेनु ऐसी माये । सदैवा जया होय ।**
**तो चंद्रहि परि लाहे । खेळावया ॥ १० ॥**

**पाहें पां शंभुचि प्रसन्नता । तया उपमान्युचिया आर्ता ।**
**काई क्षीराब्धी दूधभाता । देयिजेचिना ॥ ११ ॥**

**तैसा औदार्याचा कुरुठा । श्रीकृष्ण आपु जालिया सुभटा ।**
**कां सर्व सुखाचा वसौटा । तोच नोहावा ॥ १२ ॥**

**येथें चमत्कारु काईसा । गोसावी श्रीलक्ष्मीकांताऐसा ।**
**आतां आपलीया सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥**

**म्हणोनि अर्जुनें म्हणितलें । तें साहोनि येरें दिधलें ।**
**तेंचि सांगेन बोले । काय श्रीकृष्ण ॥ १४ ॥**

बहु = बहुसाल = नेहमींचा, पुष्कळत्वें, अतिशयतेनें, (बहुशः = वारंवार, बहुतकरून, सामान्यतः). सांडे = संपणारा. सोखासन सांगडें सोहर्पे–सुखासन सांगडे सोहपे–सुखासना सांगडे सोहपे–सोहोकासना सांगडे सोहोपे = सुखासनाच्या तोलाचें सोपें, सुखासनासारखें सोपें (८). देव–देवो : ऐसे–ऐके : मनिं रिझले = अंतःकरणामध्यें संतुष्ट झाले, (व संतोषाचे होऊन म्हणाले) (९). सदैवा = नेहमींच्या दैवाची. लाहे = लाभे. कामधेनु = काम दुह्, धेनु = सर्व इच्छा पुरविणारी कामधेनु [कामद–कामदो–कामधेनु (स्त्री.)] (१०). शंभूची–श्रीशंभूची. उपमान्युचिया–उपमन्युचिया–उपमन्य [उपमन्यू = वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद ऋषींचा ज्येष्ठ पुत्र : धौम्य ऋषीचा वडील भाऊ] : : महाशैव : : ह्यापासूनच श्रीकृष्णांनींही पण शैवीय दीक्षा घेतली होती : यानें देवांपासून क्षीरसमुद्र मिळविला [भारत–अनुशासन अ. १४] (११). जालिया–जाहालिया : : तोच–तोचि : : औदार्याचा = तेजस्वितेचा, उदारपणाचा, श्रेष्ठत्वाचा (अर्थगांभिर्य). कुरुठा = घरटा, घर. आपु = प्रापु, प्राप्त. सुभटा = पार्थाला, वीर योध्याला : : वसौटा = वसतिस्थान, आधार, आश्रय. नोहावा = होऊं नये काय? (१२). येथ–एथ. चमत्कारु–चमत्कार. काईसा–कायसा. आपलिया–आपुलिया. सवेसा = स्वेच्छेनें, संवयीप्रमाणें, इच्छेप्रमाणें [सवयस् = सगुण सोबतीसाठीं] (१३). साहोनि–हांसोनि : बोले–बोलिले : श्रीकृष्ण–कृष्ण (१४).

जसें निद्रेचें सुख नच मोडतां मार्ग तर बहुसाळ सांडावा तसें सुखासनाच्या तोलानें तें सोपें असावें, व्हावें. (८)

ह्या अर्जुनाच्या बोलण्यांनीं, देव मनीं रिझले, संतोषले, व मग संतोषाचे होऊन, तें होईल असें म्हणाले– (९)

कामधेनूसारखी आई ज्यास सदैवाची झाली, त्यानें चंद्र जरी खेळण्यास मागितला तरी मिळणारच मिळणार असें आहे. (१०)

पाहा–पाहा कीं श्रीशंभूच्या प्रसन्नतेनें त्या उपमन्यूच्या आर्ततेस तर दूधभाताचे जागीं क्षीरसागरच यावा. (११)

तसा औदार्याचा निधी श्रीकृष्ण आपणच स्वतः प्रसन्नतेनें आप्ततेचे झाले. हे वीरा! तोच श्रीकृष्ण भगवान् कीं सर्वसुखाचें वसतिस्थान व्हावें कीं होवो! (१२)

येथें चमत्कार तो कसचा? श्रीलक्ष्मीकांतासारखा स्वामी गोसावी आपण आपल्या स्वइच्छेनेंच मागावा होत आहे. (१३)

म्हणून, अर्जुनानें म्हटलें तें श्रीकृष्णांनीं हास्य करून दिधलें जें कांहीं तें आतां श्रीभगवत् श्रीकृष्ण जे त्यांनीं काय म्हणूं आदरिलें तें सांगतों. (१४)

**श्रीभगवानुवाच :**

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

[संन्यासः = काम्य कर्मत्याग : चौथा आश्रम : प्रपंचाचा त्याग, ठेव. कर्मयोगः च = आणि धर्मकृत्य करणें जें, दीर्घ यत्न. निःश्रेयसकर = मोक्षप्रद. उभौ = दोन्हीही. तयोः तु = त्याहीमध्येंपण. कर्मसंन्यासात् = कर्मत्यागापेक्षां. कर्मयोगः विशिष्यते = (वैपुल्यतेचा, अतिशयतेचा असा आहे) = कर्मयोग धर्मकृत्य करणें जें, दीर्घ यत्न करणें जें तें [(विशिष्ट, असामान्य, श्रेष्ठ, व्यक्तीचें, निराळें). शिष् + वि = (१) श्रेष्ठ असणें, भिन्न असणें, ताण करणें. (२) भेद करणें, व्याख्या करणें, नांव वृद्धिंगत करणें जें.] भिन्न असून श्रेष्ठ असें होय.]

**अन्वय :** उभौ संन्यासः कर्मयोगः च निःश्रेयस करौ तयोः तु संन्यासात् च विशिष्यते कर्मयोगः ।

**अर्थ :** संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग मोक्षदायक आहेत; परंतु त्यांतहि कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग अधिक प्रशस्त आहे (२).

**तो म्हणे गा कुंतिसुता । हे संन्यासकर्मयोग विचारितां ।**
**मोक्षकर तत्त्वतां । दोन्ही होती ॥ १५ ॥**

**तरि जाणानेणां सकळां । हा कर्मयोग कीर प्रांजळा ।**
**जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥ १६ ॥**

**तैसे सारासार पाहिजे । तरि सोहपाचि देखिजे ।**
**येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥**

**आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासाचें चिन्ह ।**
**मग सहजें अभिन्न । जाणसि तुं ॥ १८ ॥**

संन्यासकर्मयोग–संन्यासयोग = कर्मसंन्यास व कर्मयोग : दोन्ही–दोनीही : मोक्षकर = मोक्ष देणारे. तत्त्वतां = (तत्त्वज्ञ : तत्त्वविद् = तत्त्वज्ञानी, वेदांती. तत्त्वज्ञान = यथार्थज्ञान, ब्रह्मज्ञान. तत्त्वन्यास = पूजेमध्यें देहावयवावर मंत्रांनीं न्यास करणें. तत्त्व संख्यानं = सांख्यमत.) तत्त्व = १. वस्तुस्थिति, २. तात्पर्य, ३. मंदमंद नृत्य करणें, ४. देवता, ५. शरीर, ६. मन, ७. ब्रह्म, परमात्मा, ८. मूलतत्त्व, ९. खरें स्वरूप. १०. सत्य (१५). जाणानेणां सकळां = जाणत्यांना नेणत्यांना सर्वांना. कीर = खरेंच कीं, निश्चयत्वेंकरून. प्रांजळा = सुलभ, सरळ, प्रामाणिक. (प्रांजलिन् = सन्मानार्थ हात जोडणारा). तोयतरणी = नदी तोय तरून जाण्यास (नौका, नाव जशी) (१६). सोहपाचि–सोहपा हाचि = हाच सोपा. लाहिजे = मिळणारें, मिळवावें. संन्यासफळ = काम्य कर्मत्यागाचें फळ–अकर्तेपण. अनायासें = सहजच कीं. [आयास म्हणजे श्रम, कष्ट] दुःखशोकाशिवाय कीं! (१७). संन्यासाचें = त्याग, काम्य कर्मत्याग, ठेव. संन्यासियाचें = (संन्यासिन् = त्याग करणारा, तपस्वी, अन्न वर्ज्यणारा). संन्यासाचे–संन्यासियाचें. चिन्ह = खूण, लक्षण, पताका, धोरण, ठसा. सहज = स्वाभाविक, जन्मसिद्ध, सख्खा भाऊ, जातिस्वभाव. अभिन्न–हे अभिन्न = कर्मयोग व संन्यासयोग हे अभिन्न म्हणजे एकच असे, तोच, न बदललेला अखंड, सगळा, परिणाम न झालेला, न फोडलेला (१८).

**हे कुंतिसुता, पार्था! कर्मत्याग (संन्यास) व योग–(निष्काम) कर्मयोग विचार करून पाहिलें तर, तात्त्विक रीतीनें दोन्हीं मोक्षदायक म्हणजे संसारबंधनांतून मुक्त करणारे आहेत. (१५)**

तरी जाणत्यास, अजाण्यास (नेणत्यास) सकळांस हा कर्मयोग निश्चितपणें सरळ सोपा आहे; जशी नाव ही बायकांमुलांना पाण्यांतून तरून नेणारी. (१६)

तसें खऱ्याखोट्याचा विचार केला तर सहजसुलभ हाच पाहावा (देखावा), आचरावा, समजावा. त्यानें कर्मत्यागाचें फळ (संन्यासफळ) निष्काम कर्मयोगानें सहज लाभावें असें आहे. (१७)

आतां असें आहे म्हणून तुजला संन्यासाचें चिन्ह सांगेन, ज्यायोगें तूं हें संन्यास-कर्मत्याग-निष्काम कर्मयोग-सहजच अभिन्न असेंच जाणशील. (१८)

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

[ज्ञेयः = जाणण्यास योग्य. नित्यसंन्यासी = सदोदित, कायमचा, सततचा, काम्य कर्मफलत्याग करणारा. न द्वेष्टि = द्वेष करीत नाहीं. न कांक्षति = आशा धरीत नाहीं, वाट पाहात नाहीं, इच्छित नाहीं. निर्द्वंद्व = सुखदुःखातीत, उदासीन. सुखम् बंधात् प्रमुच्यते = सहज खुषीनें, आनंदानेंच कर्मबंधापासून मुक्त केला जातो, मुक्त होतो, निसटून जातो. महाबाहो = [(वे.) बाहु = देहाचा ऊर्ध्वभाग. महत् = मोठा, विस्तृत (सां) महत्तत्त्व, बुद्धि. बाहु = हाताचा] विस्तृत बाहूंचा.]

**अन्वय :** यः न द्वेष्टि न कांक्षति सः नित्यसंन्यासी ज्ञेयः । हे महाबाहो, हि निर्द्वंद्वः बंधात् सुखं प्रमुच्यते ।

**अर्थ :** अर्जुना, जो कशाचाहि द्वेष करीत नाहीं व कसलीहि आसक्ति ठेवीत नाहीं, तोच नित्य संन्यासी समजावा. कारण रागद्वेषादि द्वंद्वरहित पुरुष अनायासेंच कर्मबंधनापासून मुक्त होतो (३).

**तरि गेल्याची से न करि । न पवे त्याची चाड न धरि ।**
**जो निश्चळ अंतरीं । मेरु जैसा ॥ १९ ॥**

**आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।**
**तो पार्था संन्यासि जाण । निरंतर ॥ २० ॥**

**जो मनें ऐसा जाला । संगी तोचि सांडिला ।**
**म्हणोनि सुखें सुख पावला । आखंडित ॥ २१ ॥**

**आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें ।**
**जें घेतें जालें स्वभावें । निःसंग म्हणोनि ॥ २२ ॥**

**देखें अग्नि विझोनि जाये । मग केवळ राखोंडि होये ।**
**तैं तो कापुसें गिंवसुं ये । जयापरि ॥ २३ ॥**

**तैसा असतेनि उपाधि । नाकळिजे तो कर्मबंधीं ।**
**तयाचिये बुद्धि । संकल्प नाहीं ॥ २४ ॥**

**म्हणोनि संकल्प जैं सांडे । तैंच गा संन्यास घडे ।**
**याकारणें दोन्हि सांगडे । संन्यासयोग ॥ २५ ॥**

गेल्याची-गेलियाची. न पवे त्याचि-न पवता = पावणारें मिळणारें नव्हें जें. निश्चळ-सुनिश्चळ = चांगला स्थिर. से = सय, सई, आठवण. चाड = इच्छा. मेरु = पर्वतविशेष, माळेचा मधला मणि. (मेरुपाइजं = रुपें. मेरुपृष्ठ = आकाश, स्वर्ग. मेरुयंत्र = सूत काढण्याची चाती. मेरुकः = ऊद, धूप) (१९).

तो पार्था–पार्था तो. [मी माझें आणि तुझें । न धरी टाकी परते ओझे ॥ (अभंग-गाते श्रोते. गाथा ज्ञा. देवाची आळंदी)] (२०). जाला–जाहला. संगी = संसारसंगानें. निःसंग = निःस्पृह, निःस्वार्थ, विरक्त. सांडिला = त्यजिला. सुखें सुख पावला = सहजसुखानेंच आनंदास आला (२१). निःसंग = निःस्पृह होऊन निःस्वार्थतेनेंच कीं, विरक्त असाच कीं होऊन, का पूर्वींच झालेला त्याचें मूळचेंच कीं निःस्पृहतेचें वर्तन म्हणून आता त्यास गृहादिक असलें तरी तेथें निःस्वार्थ बुद्धीच एक परिणमून असलेली कीं (२२). मग केवळ राखोंडि = मग जे राखोंडी केवळ. तो–ते. जयापरि–जियापरी. गिंवसुं ये = झांकतां येते, शोधतां येते, कवटाळणें जें (२३). तयाचिये–जयाचिये. असतेनि उपाधि = (उपाधि = विशेष गुण, कारण, हेतु, धर्मचिंतन, कुटुंब-पोषणासक्त.) उपाधि असतांही. नाकळिजे कर्मबंधीं = कर्मबंधानें बांधला जाणारा नाहीं. बुद्धिसंकल्प नाहीं = महत् तत्त्व त्याची बुद्धि ही संकल्पारूढ नाहीं म्हणून (२४). संकल्प–कल्पना = विकल्प–या–ह्ये. सांगडे = नारखें (नदीचें पाणी तरून जाण्याकरितां केलेली भोपळ्याची सांगड). **कल्पना** = हत्ती सजविणें, शोभवणें, केशरचना, ठरविणें, युक्ति, शोध, विचार, कापणें, कतरणें, करणें. **संकल्प** = इच्छा, हेतु, उद्देश, मनोव्यापार, विचार, कल्पना, निश्चयात्मक ज्ञान, अंतःकरण, निश्चय (२५).

गेल्याची आठवण करीत नाहीं. न मिळालें त्याची मनीं चाड धरीना. जो मेरुसारखा अंतःकरणीं सुनिश्चळ असा. (१९)

मी व माझें अशी आठवण ज्याचें अंतःकरण विसरलें आहे, हे पार्था! तो निरंतर संन्यासी जाण. (२०)

जो मनानें असा झाला, देहसंगानें तोचि सांडिला, व्हावाच, होतो. आणि म्हणून सुखी असा तो, सुखानें सहजच कीं, अखंडित सुख आनंद पावला. (२१)

आता गृह आदिकरून सर्व हें कांहीं त्यानें त्यजावें असें नाहींच, त्यजण्याचें त्यास कारणच नाहीं. जें निःसंगतेवरच कीं, घेतलें गेलेलें असें स्वभावेंकरून सहजच कीं. (२२)

असें पाहा कीं, अग्नि विझून गेल्यावर आग जशी केवळ राखोंडी, ही तर अहो, कापसामध्येंही गुंडाळतां येणारी जशी का (२३).

तरी उपाधी असूनही (आहेच आहे उपाधी ह्या देहासंबंधीं) तो कर्मबंधानें आकळला जात नाहीं. कारण काय, तर त्याच्या बुद्धीमध्यें संकल्प नाहीं म्हणून (२४).

म्हणून कल्पना करणें, जेव्हां का सांडतें, नाहींसें होतें, तेव्हां तरच कीं, संन्यास (कर्मत्याग) घडतो, म्हटला होतो. ह्या कारणास्तव संन्यास (कर्मत्याग) व कर्मयोग (निष्काम कर्मयोग) हे दोन्हीही सोबतीच होत. (२५)

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

[सांख्ययोगौ = ज्ञानयोग व कर्मयोग असे दोन. पृथक् = निरनिराळें. बालाः प्रवदन्ति = अज्ञान जाहीर करतात. न पंडिताः = पंडित म्हणत नाहींत कीं, ज्ञानयोग व कर्मयोग हे निरनिराळे आहेत असे. आस्थितः = वर बसते, आश्रयणें, धारण करणें, पाळणें, अनुसरणें, सज्ज होणें, प्रतिज्ञा करणें. एकम् अपि सम्यक् आस्थितः = एक जरी चांगला आस्थेचा केला तरी. उभयोः फलम् विंदते = दोहींचें फल अनुभविलें होतें, जाणलें जातें, मानणें होतें, शिकविलें होतें.]

**अन्वय :** बालाः सांख्ययोगौ पृथक् प्रवदन्ति, न पंडिताः । एकमपि सम्यक् आस्थितः उभयोः फलं विंदते ।

**अर्थ :** बालाः म्हणजे अज्ञ लोक ह्या (संन्यासाला) सांख्याचीं व योगाचीं पृथक् पृथक् फळें आहेत, असें म्हणतात. परंतु ज्ञाते पुरुष हें म्हणतात कीं, ह्या दोन्हीं मार्गांपैकीं एक जरी आस्थेनें वागविला तरी दोन्हींचेंहि फळ अभिन्नतेनें मिळतें (४).

**यऱ्हवि तऱ्ही पार्था । जे मूर्ख होति सर्वथा ।**
**ते सांख्ययोगसंस्था । जाणति केविं ॥ २६ ॥**

**सहज तें अज्ञान । म्हणोनि म्हणती हे भिन्न ।**
**येऱ्हवि दिपाप्रति काय आन आन । प्रकाश आहती ॥ २७ ॥**

**पैं सम्यक् येणें अनुभवें । जिहिं देखिलें तत्त्व आघवें ।**
**तें दोहितें ऐक्यभावें । मानि गा ॥ २८ ॥**

सांख्ययोगसंस्था = सांख्य–ज्ञानयोग (ज्ञानरूप मोक्षसाधन) : : योग–कर्मयोग, धर्मकृत्य करणें जें. दीर्घ यत्न–याची व्यवस्था–(निष्काम कर्मयोग × धर्मकृत्य करणें जें × दीर्घ प्रयत्नानें)–[ सांख्य = १. संख्येसंबंधीं. २. तर्कप्रवीण. ३. ज्ञानवान, सर्व जग परमाणूपासून झालें असें मत.—यांत फक्त पंचवीस तत्त्वें मानतात. ४. तत्त्वज्ञान. ५. संन्यासमार्ग ] (२६). सहज स्वाभाविक निसर्गतः अज्ञान आणि म्हणून भिन्न असें म्हणतात = सहजातें–सहज तें : काय–काई. आन आन–आनान = निरनिराळें, वेगवेगळें. अहति–आहाती = आहेत. (२७). येणें–एके. दोहितें–दोहितेही. (दोह : फल). पैं = यद्यपि, तथापि. **तत्त्व** = परब्रह्म, ब्रह्म, परमात्मा, सत्य, देवता, मन, शरीर, खरें स्वरूप. (सम्यच्) सम्यग् = चांगलें (स्त्री. समीची) खरें, बरोबर असणारें, बिनचूक, योग्य, रम्य, प्रिय. मानि गा–मानिती गा = स्वतःला मानतात, अभिमानी होतात, मान देतात, पूजतात (२८).

एरव्हीं पाहिलें असतां हे पार्था, जे सर्वथैव मूर्ख होतात ते कर्मत्याग (संन्यास) व कर्मयोग (निष्काम कर्मयोग) ही संस्था कमची जाणतील ते ! (२६)

ते सहजतेचें असें अज्ञान आणि म्हणूनच ते ह्या दोहींना भिन्न म्हणतात. एरव्हीं दीपप्रकाशाकडे पाहिलें तर अनेक दिवे तरी प्रकाश एकच कीं! (तेथें दिवे अनेक असले तरी) निरनिराळा प्रकाश नसतो जसा केव्हांही. (२७)

पण सम्यक अशा अनुभवावर उभें होऊन ज्यांनीं अवघें सर्व तत्त्व देखण्यानें देखिलें, तें तर ह्या दोन्हींना ऐक्यभावावरच कीं मानतात, दोन्हीं एकच म्हणतात. (२८)

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

[ प्राप्यते = (आप्+प्र = गांठणें, पोंचणें, भेटणें, ठेवणें, जाणणें, पोंचणें, देणें, कळवणें) गांठलें जातें, जाणलें जातें. गम्यते = (जवळ जाणें, पावणें, स्थितीला जाणें, संभोग करणें) = पावलें होतें, पावतें. एकं = तोच, खरे, असामान्य, मुख्य. यः पश्यति स पश्यति = (दिश् = दाखविणें, आज्ञापणें, सांगणें, शिकवणें. दृश् = मानणें, भेट घेणें, पाहणें, जाणणें, दिसणें, भासणें, आढळणें, दाखविणें, पुढें हजर करणें, सिद्ध करणें, पुरावा देणें). जो पाहात असतो तोच मानतो, पुराव्यानें सिद्ध करतो. [ पश्यंति–वैखरीशब्द-निष्पत्तिर्मध्यमाश्रुतिगोचरा । द्योतितार्था यः पश्यन्ति सूक्ष्मवागनपायिनी ॥ (द्योतक = प्रकाशक, बोधक, तेजस्वी) ]. ]

**अन्वय :** सांख्यैः यत् स्थानं प्राप्यते तद्योगैरपि गम्यते । यः सांख्यं योगं च एकं पश्यति स पश्यति ।

**अर्थ :** जें सांख्यांना प्राप्त होतें, तेंच योग्यांनाहि प्राप्त होतें. सांख्य व योग हे एकच आहेत असें पाहतो तो ज्ञाता होय (५).

**आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि कर्मयोगीं गमिजे ।**
**म्हणोनि ऐक्यता दोहींतें सहजें । याहीपरि ॥ २९ ॥**

**देखें आकाशा आणि अवकाशा । भेद नाहिं जैसा ।**
**तैसें ऐक्य योगसंन्यासा । वोळखे जो ॥ ३० ॥**

**तयासीचि जगीं पाहिलें । आपण पैं तेणें देखिलें ।**
**जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ॥ ३१ ॥**

कर्मयोगी–योगी : ऐक्यता–ऐक्य = एकी, एकमत, एकरूपता. ( एकता = एकी, तादात्म्य ). याहीपरि–इयापरि = ह्याही तऱ्हेनें. सांख्यीं = ज्ञानमार्गानें, ज्ञानरूपमोक्षसाधनानें. योगी गमिजे = कर्मयोगानें पावावे, जवळचें होणें होतें. पाविजे = स्थितीला जाण्याचें होतें (२९). अवकाश = पोकळी. योगसंन्यासा = कर्मयोगाचें व संन्यासाचें = कर्मत्यागाचें ऐक्य ओळखीचें करतो (३०). पाहिलें = प्रगट झालें, ज्ञानाचि पहाट झाली, ज्ञान हें प्राप्तीचें झालें, दिवस उगवला. आपण पैं = स्वतः आपणांस. सांख्ययोग = ज्ञानयोग व कर्मयोग ( निष्काम ) यांची व्यवस्था. भेदेंविण = न विभागलेले. सदृश = एकरूप, साम्य, एकरूपता, निकट संबंध असलेले (३१).

सांख्यांमध्यें जें पावतें तेंच योगामध्यें भेटतें, समजतें आणि म्हणूनच त्याप्रमाणें दोहोंचें ऐक्य सहजच कीं. (२९)

असें पाहा, आकाश व अवकाश यांमध्यें भेद नाहीं जसा, तसा कर्मयोग ( निष्काम कर्मयोग ), कर्मत्याग ( संन्यास ) यांमध्यें ऐक्य ओळखतो जो (३०).

त्यासच कीं, जगांत प्रभात झाली, ( पहाट झाली ) होय. आपणां स्वतःसच त्यानें देखणा होऊन पाहिलें, देखिलें. ज्यास का हें सांख्यतत्त्व ( संन्यास ), व योगतत्त्व ( निष्काम कर्मयोग ) भेदरहित असे समजेम आलें, जाणवलें (३१).

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

[ संन्यासः = कर्मत्यागाचें तत्त्व. अयोगतः आप्तुम् दुःखम् = योगभ्रंशामुळें, अनुचितपणामुळें, ग्रहांच्या कुयोगामुळें, ताटातुटीमुळें भेटणें कठीण. योगयुक्त–युक्त योगी–चित्तवृत्ति निरोधानें जोडलेला. मुनि = मौनी, योगी, संन्यासी, तपस्वी, वानप्रस्थाश्रमी, ( मुनिः = ४ मुनि = व्यास, अगस्त्य, पाणिनी, गौतमबुद्ध, इत्यादि. ) न चिरेण = फार वेळ न लागतां, उशिरानें नव्हें ( चिरजीविनः = ७ चिरंजीव = अश्वत्थामा, बलि, व्यास, मारुति, बिभीषण, कृप व परशुराम ). अधिगच्छति = मिळवितो, जवळ जातो, शिकतो, समजून घेतो, पति करतो. ब्रह्म = ओंकार, ईश्वर, परमात्मा, ब्राह्मणत्व, मोक्ष, अध्यात्मज्ञान, स्वरूप, ज्ञानतत्त्व. ]

**अन्वय :** हे महाबाहो, अयोगतः संन्यासः आप्तुं दुःखम् । योगयुक्तः मुनिः न चिरेण ब्रह्म अधिगच्छति ।

**अर्थ :** असें आहे तरि "अयोगतः" म्हणजे कर्मयोगावांचून संन्यासच मुळीं प्राप्त होणें दुर्घट आहे, अशक्य आहे. योगयुक्त मुनीला लवकरच ब्रह्म सांपडतें. जवळच दूर नव्हें असें व लांब नव्हें असें "ब्रह्म" समजतें (६).

**जो युक्तिपंथे पार्था । चढे मोक्षपर्वेता ।**
**तो सांख्यसुखाच्या निजमाथा । वहिला पावे ॥ ३२ ॥**
**योगस्थिति जया सांडे । तो वांयाचि हव्यासि पडे ।**
**परि प्राप्ति कधिं न घडे । संन्यासाचि ॥ ३३ ॥**

युक्तिपंथे = योगयुक्तिपंथे = योगकर्मयोग, वहिवाटीनें, उचित योजना, नैपुण्य, विवेक (ज्ञा.) सांकेतिक भाषणमार्गानें. सांख्यसुखाचा निजमाथा-महासुखाचा निजमाथा = ब्रह्मसुखाचा माथा, शिखर. मोक्षपर्वत = पर्वत रूपक, खडक, वृक्षी मोक्षरूपी गिरि शैल. वहिला पावे = सत्वरच गांठतो, लवकरच पोहोंचतो (३२). योगस्थिति-येरा योगस्थिति = कर्मयोग आचरीत नाहींत, त्यांना ज्ञानप्राप्ति. सांडे = भेटत नाहीं, मिळत नाहीं. हव्यासि पडे = हांव, छंदामध्येंच पडतो. वांयाचि-वांयाचि गा = व्यर्थच कीं. कधि-कहीं = कधींहि. अर्थ = पण इतर दुसरे जे कोणी कर्मयोग = (धर्मकृत्य करणें, दीर्घ प्रयत्नाचे) आचरीत नाहींत, ते ज्ञानप्राप्तीच्या लोभांत, हव्यासामध्यें व्यर्थ पडतात ; त्यांना संन्यासाचें-कर्मत्यागाचें-निष्काम कर्मयोगाचें फळ मिळत नाहीं (३३).

हे पार्था, जो युक्तिपंथानें, योगयुक्त होऊन, योग-युक्ततेच्या उद्देशाचें होऊन मोक्षपर्वतावर चढतो, तो महासुखाच्या माथ्यावर, पठारावर सहजच पहिला पोंहोंचतो, पावतो. (३२)

दुसऱ्या इतर कोणाहि ज्यांना, ज्याची योगस्थिति ही हरवलेली असते, तो व्यर्थच कीं हव्यासाचा होतो, योगस्थितीच्या छंदाचा होतो. पण त्यास कर्मत्यागाची, संन्यासाची प्राप्ति केव्हांहि भेटत नाहीं, घडत नाहीं. (३३)

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

[योगयुक्तः = कर्मयोगनैपुण्यः. विशुद्धात्मा = निर्मळ, निष्पाप, शुद्ध, सद्गुणी जीवप्राणी. विजितात्मा = जयवंत जीवप्राणी आत्मा (विजितिः = जय, यश). जितेंद्रियः = आत्मसंयमी, जितात्मा. सर्वभूतात्म-भूतात्मा = सर्वभूत, आत्मभू (योनि) = ब्रह्मा, विष्णु, शिव. कर्म कुर्वन् अपि न लिप्यते = कर्म करीत राहिला असला तरी कर्मानें बद्ध होत नाहीं, लिप्त होत नाहीं. आत्मा = जीव, प्राणी, आपण, स्थूल शरीर, मन, बुद्धि, महत्तत्त्व, स्वरूप, वाचा, यज्ञ.]

**अन्वय :** योगयुक्तः विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेन्द्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ।

**अर्थ :** जो योगानें युक्त आहे, जो बुद्धिशुद्ध झालेला आहे-ज्याची बुद्धि शुद्ध झालेली आहे-ज्यानें मन ताब्यांत ठेविलें आहे, ज्यानें इंद्रियें स्वाधीन ठेविलीं आहेत, आणि सर्वांभूतीं असलेल्या आत्मतत्त्वाशीं ज्याच्या आत्म्याचें ऐक्य झालें आहे, असा "स्थितप्रज्ञ" कर्मे करीत असूनहि लिप्त होत नाहीं (७).

**जेणे भ्रांति पासुनि हिरतले । गुरूवाक्यें मन धुतलें ।**
**मग आत्मस्वरूपि घातले । हिरोनिया ॥ ३४ ॥**

**जैसे समुद्रिं लवण न पडे । तव वेगळे अल्प आवडे ।**
**मग होय सिंधूचि येवढे । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥**

**संल्कपौनि काढिले । जयाचे मनचि चैतन्य जाले ।**
**तेणें येकदेशिये व्यापिले । लोकत्रय ॥ ३६ ॥**
**आतां कर्ता कर्म करावे । हे खुंटले तया स्वभावें ।**
**आणि करि जरि आघवे । तरि अकर्ता तो ॥ ३७ ॥**

हिरोनिया–रोउनिया = हिरावून घेऊन आत रोंविलें, खोंचलें (विश्), शिरकविलें. भ्रांति पासुनि हिरतले = भ्रांतीपासून–मिथ्या ज्ञानापासून–संशयापासून–हिरावून घेतलें, सोडवून घेतलें. गुरुवाक्यें मन धुतलें = (गुरुश्रुति म्हणजे गायत्री मंत्र) पुण्य पूज्य पूर्वजांच्या वाक्यानें–वाक्यश्रवणानें–मन स्वच्छ केलें, निष्पाप केलें, निःशंकतेचें केलें. आत्मस्वरूपि = परमात्मस्वरूप ज्ञानामध्यें, स्वरूपामध्यें (३४). पडे–न पडे. लवण = मीठ. वेगळे अल्प = निराळेपणें थोडेंसें असें. (जीवित) आवडणारे = समुद्रिं मिळे तेव्हां तर सिंधूचि (समुद्राचि) एवढें होतें (३५). जाले–जाहले. येकदेशीय–एकदेशीय परि. संकल्प = इच्छा, मनोव्यापार, हेतुकल्पना, उद्देश, अंतःकरण. मन = सुखदुःखादि ज्ञानाचें इंद्रिय, सद्सद्विवेक, बुद्धि, विचार, अंतःकरणशक्ति, संकल्प-विकल्पात्मक चैतन्य = ब्रह्मरूप [जीव, प्राण, मन, चित्त, ज्ञान—परमात्मा, प्रकृति माया (वे.)] एकदेशीय = संकुचित का मर्यादित असे अंशाचे का भागाचे ते. लोकत्रय = भुवनें तीन = भुवन, विश्वजन, निजस्वरूप, प्रकाश, चक्षुरींद्रिय–भुः। भुवः। स्वः। स्वर्ग, मृत्यु, पाताळ. लोकयात्रा = जगाचा व्यवहार. (त्रिलोहक = सोनें, रूपें, तांबें) (३६). आतां कर्ता कर्म करावे, हे तया स्वभावें खुंटले = त्याच्या कल्पना ज्या कीं, मी कर्ता, हें कर्म, इत्यादि या कल्पना सहजच सुटल्या, बंद पडल्या, थांबल्या, नाहींशा झाल्या, खुंटल्या, सहजच आपोआपच, स्वाभाविकपणेंच, सहधर्मेंकरून. अकर्ता = भेदनिवृत्ति तादात्म्य (संन्यासफळ लाभलें जसें, ओवी १७). अकर्मन् = मोक्ष, क्रियाराहित्य (३७).

ज्यानें आपलें मन भ्रांतीपासून हिरावून घेतलें व गुरुवाक्यावरच उभें केलें, धुतलें मगच कीं आत्म-स्वरूपामध्येंच कीं रुतवून घातलें, रुतविलें. (३४)

समुद्रामध्यें लवण–मीठ–हें नच पडतां वेगळें अल्प असें थोडेंसें जरी तरी तें आवडतें असावें असें वाटतें, आवडावेंच असें आहे; पण कदाचित् मग समुद्रिं–सिंधूमध्यें मिळालें, तेव्हां तर तें सिंधूचि होतें. सिंधूएवढें होतें कीं, म्हणजे तेथील आवड ती तर अगाध, अफाट, खोल, व्यापक अशी. (३५)

तसें संकल्पापासून, वासनांतून काढलेलें ज्याचें मनच कीं चैतन्य झालें, तेथें त्या मनरूपी चैतन्यानें तर एकदेशीय असें जरी, तरी त्यानें तिन्हीं लोक व्यापिले होतात, व्हावेत हें केव्हांहि–लोकत्रय व्यापिले कीं! (३६)

[व आतां कर्ता, कर्म करणें हें त्याचे स्वभावेंकरूनच कीं सुटलें, थांबलें, बंद झालें. वर जरी अत्रघे तो कांहीं करी, तरी तो अकर्तांचि कर्मत्यागी संन्यासीच कीं!] कर्म करणारा, कर्म कार्य क्रिया ही त्रिपुटी त्याच्या मूळच्या मनांतूनच कीं बंद पडली, सुटली, व आतां कर्म करी जरी तरीपण स्वभावेंकरूनच कीं तो ज्यास कर्तेपणाचा डौल नाहीं, कर्तृत्वाभिमान नाहीं, असा झाल्यानें तो अकर्ताच, कर्मत्यागी, संन्यासीच म्हटला होय कीं! (३७)

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥**

[किंचित् = कांहींही थोडेंसुद्धां काम, कर्म. युक्तः = योगयुक्तः = धर्मकृत्य करणें जें, दीर्घ प्रयत्नानें असणें जें तेथेंच जुंपलेला, जोडलेला. तत्त्ववित् = सत्यब्रह्माचें खरें स्वरूप जाणणारा. मन्येत् = समजतो, समजावें. पश्य = डोळ्यांनीं पाहणें. श्रृण् = कानांनीं ऐकणें. स्पृश् = त्वचेचा स्पर्श जाणणें, स्पर्श करणें. जिघ्र = नाकानें श्वास घेणें, सुवास घेणें, बोलणें, इत्यादि. अश् = खाणेंपिणें. अश्नन् = रसरुचि घेत असतांना. गच्छन् = पायांनीं चालणें, जाणें येणें करणें जें. स्वपन् = निद्रा घेणें, स्वप्नादि प्रकार. श्वसन् = श्वास घेणें, श्वासोच्छ्वासादि क्रिया.]

**अन्वय :** युक्तः तत्त्वविद् नैव किंचित्करोमीति पश्यन् शृण्वन् स्पृशन् जिघ्रन् अश्नन् गच्छन् स्वपन् श्वसन् ।

**अर्थ :** योगानें युक्त असलेला तत्त्ववित्, तत्त्ववेत्ता, स्वतः मी यत्किंचित् कांहींच करीत नाहीं असें समजतो. पाहतांना, ऐकतांना, स्पर्श करतांना, वास घेतांना, खातांना, जातांना, झोप घेतांना, श्वासोच्छ्वास करतांना—

**जे पार्था तया देहि । मी ऐसा आठव नाहि ।**
**तऱ्ही कर्तृत्व कैचे काई । उरे सांगे ॥ ३८ ॥**
**ऐसे तनुत्यागेविण । अमूर्ताचे गुण ।**
**दिसती संपूर्ण । योगयुक्त ॥ ३९ ॥**
**येऱ्हवि आणिकाचियेपरि । तोहि एक शरीरि ।**
**अशेषाहि व्यापारि । वर्ततु दिसे ॥ ४० ॥**
**तोहि नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे ।**
**परि तेथिचा सर्वथा नोहे । नवल देखैं ॥ ४१ ॥**
**स्पर्शासि तन्हि जाणे । परिमळ सेवि घ्राणें ।**
**अवसरे उचित बोलणें । तयाही आथी ॥ ४२ ॥**
**अहारातें स्वीकारि । त्यजावें तें परिहरि ।**
**निद्रेचा अवसरि । निदिजे सुखें ॥ ४३ ॥**
**आपुलेनि इच्छावशें । तोहि गा चालता दिसे ।**
**पैं सकळ कर्मैं ऐसे । राहटे कीर ॥ ४४ ॥**

पार्थ–पार्था. देहि = देहधाऱ्यास (देहि = आत्मा). मी = नामरूपादि देहबुद्धीचें असणें. ऐसि–ऐसी–ऐसा. (आठवण + से) = आठव–आठऊ. कर्तृत्व = कर्तेपणाचा अभिमान, अहंमन्यता. कैचे काई = कसचें काय तें. उरे = अहंपणाचें असणें जें, मी अमका तमका म्हणून तें उरत नाहीं, त्याचें देहबुद्धीचें असणें शिलकीनें नसतें (३८). तनुत्यागेविण = देहधारी असतांनासुद्धां, शरीर न टाकतांहि. अमूर्त = अव्यक्त, निर्गुण, आत्मा. गुण = लक्षणें, चिन्हें. योगयुक्त = निष्काम कर्मयोगी असा देखणा दिसतो (३९). आणिकाचिये परि = दुसऱ्याशीं तोललें का–बरोबरीनें पाहिलें असतां, इतरांप्रमाणें. शरीरि = शरीरधारी, देहधारी, मूर्त. अशेषाहि = सर्वकांहीं व्यापारां–कामांमध्यें वागत आहे असा दिसतो (४०). नेत्रीं = नेत्रामध्यें, नेत्रानें. श्रवणीं = कानानें, कानामध्यें, श्रवणानें, श्रवणामध्यें. परि = पण तेथिचा-त्या पाहणाऱ्या का ऐकणाऱ्या इंद्रियांचा तो केव्हांहि होत नाहीं, हें नवलच कीं देख–पाहा कीं! (४१). स्पर्शास जाणतो [स्पर्श = जातगोत जाणणें (चर्मचक्षु-ज्ञानचक्षु)]. परिमळ = सुवास नाकानें घेतो. [अ. ९–३५२, तऱ्ही करोनि रससोय बरवी । कानीं केविं भरावी । फुलें आणोनि बांधावीं । डोळां केविं ॥ ३४९ ॥ तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ॥ ३५२ ॥ येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेंआन । म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३५१ ॥ (३४६–३५१ पाहा)] (४२). अहारातें स्वीकारि = आहार घेतो, स्वीकारतो. त्यजावें तें परिहरि = नच स्वीकाराचें व्हावें तें त्यजतो, परिहरतो–टाकतो–निरसन. निद्रेचा अवसरि = झोंपेच्या वेळेस. निदिजे सुखें = सुखानें झोंपी जातो, (निदिजे) झोंपतो. अवसरि = वेळेस (४३). इच्छावशें = (वश = ताब्यांतला, नम्र, मोहित, आज्ञाधारक, ग्रस्त, इच्छा, हांव, ताबा, अंमल, ताबेदारी, मालकी) इच्छेला वश होऊन (उ. दैववशात्). राहटे = अनुभवाची राहणी. कर्मैं–कर्म = कृत्य, धार्मिक कार्य, गुणधर्म, यत्न. कीर = निश्चयेंकरून. [मग पंचमीं गव्हरिलें योगतत्त्व ॥ २५–१० ॥ तेंचि षष्ठामाजीं प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव येकवाट । होती जियारी ॥ २६–१० ॥ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आम्हीं नादासि रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीत (हुंगित) आहों मा ॥ २०५–१० ॥ देवा, तुम्हीं जें स्वमुखानें बोलिलें, तें तर आम्हीं नादच रूपास आलेला पाहिला. नवलाचें नवल कीं, देहबुद्धि

नाहींशी होऊन, शब्द हा नादावर सगुण उभा आहे–देहबुद्धि जाऊन, योगबुद्धि पुढें होऊन आहे—अहो, आश्चर्यच कीं एक, अहो आम्हीं मस्तकानें शब्दसुमनें हुंगीत आहोंत. या बोलण्यावर श्रीकृष्ण सर्वांगीं डोलले व म्हणाले, हा अर्जुन तर भक्तिज्ञान पिकविणारा माळीच होऊन आहे : याच्या घरीं ज्ञान पिकत आहे ] (४४).

कारण काय तर, हे पार्था ! आत्मारूपी [ तया देहि ] त्या देहधाऱ्यास–आत्म्यास मी माझें असें ठाऊकच नाहीं, व असें जर, तर मग त्यास त्याचे ठायींचें असें कर्तृत्व कसचें न काय उरतें तें सांग पाहूं ? (३८).

तो असा देहधारी असतांही, शरीर न टाकतांही, अव्यक्ताचे–आत्मस्वरूपाचे (आत्मसुखयुक्ताचे) गुण त्या निष्काम कर्मयोग्यांत (योग्यामध्यें कीं) संपूर्णपणें दिसतात (३९).

एरव्हीं आणिका दुसऱ्यांच्या परोपरीनें–बरोबरीनें तोही एक शरीरधारी. अशेषाहि सर्वांही व्यापारा–कार्यामध्यें वर्तत आहे, असा दिसतो आहे जरी–(४०).

तोही डोळ्यांनीं पाहतो, कानानें ऐकत आहे. पण तेथचा कांहीं सर्वथैव नाहींच नाहीं असा, असें नवलच एक त्यासंबंधीं पाहा कीं ! (४१).

स्पर्शास जाणतो, नाकानें परिमळ सेवतो, कधीं काळीं प्रसंगीं त्याचें त्याचें बोलणेंही होत आहे (४२).

आहारास स्वीकारीत आहे; त्यजावें जें कांहीं त्याचा परिहार (करून आहे) करतो. झोंपेच्या वेळीं, प्रसंगीं सुखानेंच कीं झोंपतो (४३).

आपल्या इच्छावशेंकरूनच कीं, तोही चालत आहे, असा दिसतो व सकळ जें कांहीं कर्म कीर तें त्याचें चाललेलेंच असतें–तें त्याचें कर्मामध्यें राहाटणें होतच असतें (४४).

**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इन्द्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥**

[ प्रलपन् = लप् = बोलणें, कानांत सांगणें : प्रलप् = बोलणें, बडबडणें, शब्द करणें : प्रलपनम् = भाषण, शोक, विलाप, बडबड. विसृजन् = ( सृज् = मोकळे पसरणें–संयोग पावणें–उत्पन्न करणें, जाऊं देणें, मुक्त करणें, बाहेर टाकणें, त्याग करणें, देणें, उच्चारणें, प्रसवणें. वि = दुर्लक्ष करणें, निरोप देणें, उत्पन्न करणें, पाठवणें, मलविसर्जन करणें. गृह्णन् = गृह्ण् = गृह् = वस्तु हातांनीं घेणें. उन्मिषन् = ( डोळयाच्या पापण्या ) डोळे उघडणें–निमिषन् = ( डोळ्याच्या पापण्या ) डोळे झांकणें जें तेंसुद्धां इंद्रियें आपआपल्या विषयअर्थामध्यें वागत आहेत, प्रवर्तत आहेत, असें समजून उदास असतो— ]

**अन्वय :** प्रलपन्, विसृजन्, गृह्णन्, उन्मिषन्, निमिषन्, इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् । ( इति युक्तः तत्त्वविद् नैव किंचित्करोमीति मन्येत् । )

**अर्थ :** बोलतांना, सोडतांना, ग्रहण करतांना ( घेतांना ), पापण्या ( डोळे ) उघडतांना किंवा मिटतांना देखील, इंद्रियें आपआपल्या स्वभावानुसार विषयांमध्यें वर्तत आहेत असें ओळखून ( मी कांहींच करीत नाहीं असें समजून ) असतो (९).

**हे सांगो काय एकेक । देखें श्वासोच्छ्वासादिक ।**
**आणि निमिषोनिमिषादिक । आदिकरुनि ॥ ४५ ॥**
**पार्था तयाच्या ठायीं । हें आघवेंचि आथि पाहिं ।**
**परि तो कर्ता नव्हे कांहिं । प्रतितीबळें ॥ ४६ ॥**
**जो भ्रांतिसेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुलला ।**
**मग तो ज्ञानोदयीं चेइला । म्हणोनियां ॥ ४७ ॥**

एकेक = एकएकटे. श्वासोच्छ्वास आदिकरून = श्वस्, धापा टाकणें, सुस्कारा टाकणें, श्वासोच्छ्वास करणें, [श्वस् = १. उद्यां, भविष्यकाळीं. २. श्वासोच्छ्वास करणें, धापा टाकणें, उसासा टाकणें, सुस्कारा टाकणें. श्वसन् = श्वासोच्छ्वास, स्पर्श.] निमिष उनिमिष आदिक = निमिष = डोळे मिटणें-डोळे मिटण्यास लागणारा वेळ. १८ निमिष = १ काष्टा : १० काष्टा = १ कला : ३० कला = १ क्षण : १२ क्षण = १ मुहूर्त : ३० मुहूर्त = १ अहोरात्र. उन्मेष = उघडणें, उमलणें, तेज, चमक, प्रादुर्भाव, जागृत होणें, विस्तार (४५). पार्था तयाच्या-तयाचा-तयाचे : अवघेचि-आघवेंचि. कर्ता = कर्म करणारा. प्रतीतिबळें = आत्मज्ञानाच्या अनुभवानें, अनुभवाच्या बळानें, स्वानुभवाच्या बळावर. प्रतीति = विश्वास, खात्री, ज्ञान, अनुभव, ख्याति, आनंद, आदर, (प्रत्यय, समज). प्रतीतः = ख्याते। प्रसिद्धे। हृष्टे। आथि = आहे (४६). जो-जै = जेव्हां. भ्रांतिसेजे = अविद्यारूपी शय्येवर. सुतला-सूतला = झोंपला, निद्रिस्त झाला, सुप्तला, सूतला. तैं-तैं भुलला-भूतला = अनुभवला, भुतला, भूतला, झपाटला, भुलला, विसरला, चुकला. म्हणोनियां-म्हणौनियां. स्वप्नसुखें (स्वप्नसुखानें) = स्वप्नांतील सुखानें. ज्ञानोदयीं = ज्ञानाच्या उदयानें. चेइला = जागा झाला (४७).

असें हें एक एक काय सांगावें-पाहा कीं, श्वासउच्छ्वासादिक करूनही तसेंच निमिष उन्मेष आदिकरूनही सर्व असें. (४५)

त्याचे त्याचे ठायीं होणाऱ्या असतेंच असतें, पण आत्मज्ञानाच्या अनुभवानें (प्रतीतिबळें) पाहिलें तर, तो कांहीं तेथीचा कर्ता नव्हेच नव्हे कीं, (कारण काय तर)— (४६)

जेव्हां अविद्येच्या शय्येवर निद्रित झाला, झोंपला, सुप्त झाला, तेव्हां तर स्वप्नींच्या-स्वप्नांतील सुखानें भुलला, भोगला, भुक्तला, अनुभवला, भुतला व मग यावरच तो, आणि म्हणूनच कीं तो ज्ञानप्राप्तिसमयीं-ज्ञानाचा उदय झाल्यानें-जागा झाला; त्याचें अज्ञान दूर झालें. (४७)

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

[ब्रह्मणि कर्माणि आधाय = कर्में ब्रह्माच्या ठायीं समर्पण करून-करतो. ईश्वराला अर्पण करतो. यः संगं त्यक्त्वा करोति = निरहंकारपणें देहबुद्धीचा संग, अभिमान, देहबुद्धि सोडून करतो. स पापेन न लिप्यते-अंभसा पद्मपत्र इव = पाण्यानें पद्माचें पान जसें भिजत नाहीं, त्याप्रमाणें पापानें लिप्त होत नाहीं. (निरहंकारपणें केलेलीं कर्में बद्धक होत नाहींत).]

**अन्वय :** यः संगं त्यक्त्वा ब्रह्मणि आधाय कर्माणि करोति सः अम्भसापद्मपत्रमिव पापेन न लिप्यते।

**अर्थ :** ब्रह्माचें ठिकाणीं कर्में ठेवून, तेथील संग (आसक्ति) सोडून जो कर्में करतो, तो पापानें लिप्त होत नाहीं. तो पाण्यांत असूनही पाण्यानें लिप्त न होणाऱ्या कमलपत्राप्रमाणें असतो. (१०)

**आतां अधिष्ठानसंगती। अशेषाही इंद्रियवृत्ती।**
**आपुलाला अर्थि। वर्तती आथी ॥ ४८ ॥**

**दिव्याचेनि प्रकाशें। गृहींचे व्यापार जैसे।**
**देहिं कर्मजात तैसें। योगयुक्तां ॥ ४९ ॥**

**तो कर्में करि सकळें। परि कर्मबंधा नातळे।**
**जैसें न सिंपे जळिं जळें। पद्मपत्र ॥ ५० ॥**

अधिष्ठानसंगती = ब्रह्मसान्निध्यानें, आत्म्याच्या सत्तेनें. संगती = संयोग, भेट, सहवास, संगत, मैथुन, ज्ञान, योग्यपणा, पूर्वापार संबंध. अधिष्ठान = सत्ता, आधार, देखरेख, अंमल, मागला दरवाजा, आशीर्वाद, आसन,

पलंग, ठिकाण, राहणें, जवळ येणें. अशेषाहि=सर्व, अशेष, समस्त, कृत्स्न, निखिल, अखिल, समग्र. आपुलाला–आपुलालिया. अर्थि = विषयांत. वर्तति आथी–वर्तत आहाति = राहातात–राहाटतात. [**टीप :**—जो भ्रांतिरूप बिछान्यावर निजला तेव्हांच–स्वप्नसुखानें गुंतलेला (भुतला) होता, पण त्याला आत्मज्ञानाची जागृती झाल्यामुळें (चेइला) आतां तो कर्ता नव्हे, आत्मस्वरूपाची विस्मृति ही भ्रांति व देहबुद्धीनें संसार दुःखमय वाटणें हें स्वप्न. जेव्हां भ्रांति अविद्यारूप शय्येवर झोंपला (सूतला), तेव्हां स्वप्नांतील सुखानें भुक्तला, अनुभवला–मग तो ज्ञानप्राप्तीसमयीं जागा झाला म्हणून अज्ञान दूर झालें] (४८). दीव्याचेनि–दीपाचेनि : योगयुक्तां–योगयुक्त : कर्मजात = सर्व कर्में, कर्मसमूह, कर्मप्रशस्त. गृहींचे = गृहांतील व्यापार, उद्योग, क्रिया, योजना (४९). नातळे–नाकळे. सकळें–सकल = सर्व, संपूर्ण, सबंध, हाड, कमलकंद, रोहित गवत. न सिंपे = भिजत नाहीं [ सिच् (पिच्) = ओलें करणें ] (५०).

आतां अधिष्ठान देहसंगतीनें सर्वच्या सर्व इंद्रियवृत्ति आपआपल्या अर्थामध्येंच कीं, वर्तत–वागत–आहेत. (४८)

दिव्याच्या प्रकाशानें जसें गृहांतील व्यापार होत असतात, तसें योगयुक्तांचें कर्मजात आत्म्यामध्यें स्वरूपाप्रमाणें–(४९)

जो सकळ कर्में करतो, पण कर्मबंधांत सांपडत नाहीं; जसें पद्मपत्र जळामध्यें असलेलें, तरी तें जळानें सिंपलें, भिजलें होत नाहीं. (५०)

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥**

[केवल कायेन = देहानें, नुसत्या शरीरानें. केवल मनसा = मनानें, नुसत्या मनानें; (मन हें चित्त-चतुष्टयापैकीं असल्यानें येथें मनच एकटें तेथें यजलेलें समजावें). तसेंच बुद्धिही पण. केवल बुद्धया = बुद्धीनें. केवलैः इंद्रियैः = इंद्रियमात्रांनीं, नुसत्या इंद्रियांनीं. योगिनः = योगिन्–कर्मयोगी–निःस्पृह असे ते निष्काम कर्मयोगी. कर्म कुर्वन्ति = कर्में करतात. संगं त्यक्त्वा = निष्कामतेनें, फलाची इच्छा आसक्ति सोडून. आत्मशुद्धये=आत्मशुद्धीसाठीं (अंतःकरणपंचकामध्यें : मन, बुद्धि, चित्त, अहंकार व अंतःकरण असें पंचक आहे). म्हणून येथें आत्मा = जीव, आपण, देह, मन, बुद्धि, महत्तत्त्व, स्वभाव, वाचा इत्यादि समजावेत : इंद्रियैः–इंद्रिय = ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन (हात, पाय, डोळे इत्यादि) मन, शुक्र, रेत : : ममत्व नाहीं, फलाशा नाहीं, केवल ईश्वरप्रीत्यर्थ योगीनः कर्में करितात–संन्यासीच जसे का.]

**अन्वय :** योगिनः संगं त्यक्त्वा आत्मशुद्धये कायेन, मनसा बुद्धया केवलैरिन्द्रियैरपि कर्म कुर्वन्ति ।

**अर्थ :** योगी (कर्म) संग सोडून आत्मशुद्धीकरितां कर्म करितात. देहानें, मनानें, बुद्धीनें व केवळ इंद्रियांच्या अंतःकरणशुद्धिकरितांच केवळ हीं त्यांचीं कर्में होत (११).

**देखें बुद्धिची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुदैजे ।**
**ऐसा व्यापार तो बोलिजे । तें शरीर गा ॥ ५१ ॥**

**हेंचि मऱ्हाटें परियसि । तरी बाळकाचि चेष्टा जैसि ।**
**योगिये कर्में करिति तैसि । केवळा तनू ॥ ५२ ॥**

**मग पांचभौतिक संचलें । जेव्हां शरीर असे निजेलें ।**
**तेथें मनचि राहटे येकलें । स्वप्निं जेविं ॥ ५३ ॥**

**नवल आईकें धनुर्धरा । कैसा वासनेचा संसारा ।**
**देहा हों नेदी उजगरा । परि सुखदुःख भोगी ॥ ५४ ॥**

इंद्रियांचा गांवि नेणिजे । ऐसा व्यापार जो निपजे ।
तो केवळ गा म्हणिजे । मानसिक ॥ ५५ ॥

योगिये तोही करिती । परि कर्मातें न बांधिजति ।
जे सांडिलि आहे संगती । अहंभावाचि ॥ ५६ ॥

आत्मा जाल्या भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त ।
मग इंद्रियांचें चेष्टित । विकळ दिसे ॥ ५७ ॥

स्वरूप तरि देखे । आळविलें ऐके ।
"वो" शब्द बोले मुखें । परि ज्ञान नाहिं ॥ ५८ ॥

हें असो काजेविण । जें जें कांहिं कारण ।
तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥

मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धिचें कर्म निरुतें ।
वोळख अर्जुनातें । म्हणे श्रीहरी ॥ ६० ॥

ते बुद्धी धुरे करूनी । कर्मे करिती चित्त देउनी ।
परि ते कर्मापासुनी । मुक्त दिसती ॥ ६१ ॥

जे बुद्धीचि पैं ठाउनि देहिं । तया अहंकाराचि सेची नाहिं ।
म्हणोनि कर्मे करितां पाहीं । चोखाळले ॥ ६२ ॥

आगा करितेनिविण कर्म । तेंचि ते निष्कर्म ।
हे जाणति सवर्म । गुरुगम्य तें ॥ ६३ ॥

आतां शांतरसाचें भरितें । सांडिताहे पात्रांतें ।
जें बोलणें बोलापरौतें । बोलावे तें ॥ ६४ ॥

येथें इंद्रियांचा पांगु । जयासि फिटला आहे चांगु ।
तयासिच आथि लागु । परिसावया ॥ ६५ ॥

हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथासंगु ।
होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणौनियां ॥ ६६ ॥ } (पाठभेद)

जें मना आकळितें कुहाडें । घांगुसितां बुद्धी नातुडे ।
तें दैवाचेनि सुरवाडें । सांगावें तुज ॥ ६७ ॥

जें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि जरि फावे ।
तरि आणिकें काय करावें । कथा सांगे ॥ ६८ ॥

हातिशय श्रोतियांचा । जाणोनि दास निवृत्तिचा ।
म्हणे संवाद तया दोघांचा । परिसोनि परिसा ॥ ६९ ॥

मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें । आतां प्रासाचें चिन्ह पुरतें ।
सांगेन तुज निरुतें । चित्त देई ॥ ७० ॥

देखें = पहा कीं. बुद्धिची भाष = भास, वार्ता, भाषा, चिन्ह. भास् = शोभणें, प्रकाशणें, वाटणें, भासणें, दिसणें, किरण, शोभा, प्रकाश, तेज, कांति, इच्छा, प्रतिबिंब. भाषा = बोलणें, भाषण, करार, प्रतिज्ञा, बोली, भाषा, व्याख्या, लक्षण, सरस्वति, वेद, भिन्नलौकिक, संस्कृत प्राकृत भाषा. भाष् = बोलणें, सांगणें, म्हणणें.

वार्ता = संभाषण, बातमी, राहणें, पोटाचा धंदा, व्यापार व शेती, वांग. बुद्धिची भास–षा–ष–क नेणिजे = भास–भाषा–तीर्थ अतीर्थ हे भाषा १८–५५९ (तहान भागवील तें पाणी–तेथें पवित्रापवित्राचा विचार नसतो) बुद्धीनें जाणणेंच नाहीं, बुद्धीनें स्थिर होणें नाहीं. बुद्धि = विचार, समजूत, मत, हेतु, उद्देश, नांव, वचन, विचार, प्रयोग (ऱ्हस्व बुद्धि, दीर्घ बुद्धि), मग सर्वत्र जें जाणतें। तें बुद्धिचें कर्म निरुतें। ५–६०। बुद्धि = जाणणें. परबुद्धि = बुद्धि, दृष्टि आत्म्याकडे वळली म्हणजे इतर विचारांचा पसारा संकोच पावतो—१६–१११। नेणिजे = बुद्धीची वार्ता जाणीत नाहीं, बुद्धिपुरस्सरतेचें असें नाहीं. मनाचा अंकुर (नुदैजे = उगवत नाहीं). ऐसा व्यापार तो बोलिजे = असा जो हालचालीचा व्यापार तो म्हटला जातो कीं : तें शरीर गा = शारीर गा = केवळ देहाचा व्यापार. शारीर = शरीरासंबंधीं, मूर्तिमंत, जीवात्मा, शरीररचनाशास्त्र, वनस्पतिविशेष. शारीरक = शरीरासंबंधीं, आत्मस्वरूपाचा विचार, ब्रह्मसूत्रभाष्य. शारीरकीय = आत्मप्रतिपादक ग्रंथ. शारीरिक = शरीरासंबंधीं (५१). मराठे–मऱ्हाटे : (मऱ्हाटिया ९०४। १३) : परियसि–परियेसि : बाळकाचि चेष्टा = अर्भकाची अवयवाची हालचाल. केवळा तनू = केवळ तनूनें–शरीरानेंच नुसत्या (देह–कलेवरम्–गात्रवपुः संहननं वर्ष्म विग्रहः। कायो देहः क्लीब पुंसोः स्त्रियां मूर्तिस्तनुस्तनः (अ. को.) (५२). पंचभौतिक = पंचभूतांचें. संचलें = बनलेलें. शरीर = देह. निजेलें–निदेलें. मनचि राहटें येकलें स्वप्नि जेविं = मनच एकटें स्वप्नामध्यें राहाटत आहे असें होतें–असतें–होत असतें (५३). नवल आईकें–ऐके = नवलच एक तें ऐकण्याचें कर. वासनेचा संसारा = संसारा (पसारा), मिथ्या ज्ञानजन्य संस्कार, इच्छा, आवड. (वासन) व्यसन, वेसन. वासना = स्मरण, कर्माचा मनावर राहणारा संस्कार (न्या.) अज्ञान. संसार (संसारिन् = प्राणी, जीवात्मा)–जन्ममरणप्रवाह, ऐहिक जीवित, प्रवाह, मार्ग, गति (फळ) (सां.) विश्व [संसारगुरु = मदन, जगद्गुरु. संसारमार्ग = योनि]. संसरणं = गमन, उत्पत्ति, जन्म, संसार, युद्धारंभ, सैन्याचें निर्वेध गमन, नगराबाहेरचें विश्रांतिस्थान, राजमार्ग. [सृ+सं = १. एकत्र जाणें (वाहणें), जवळ जाणें, स्थितीला जाणें, गरगरा फिरणें. २. आंत घालणें, शिरकविणें, गरगर फिरवणें, करविणें]. उजगरा (= प्रसिद्धि) देहा हों नेदी = जागर–जागरा–जागरण = जागृतावस्था, जागरण. दक्षता = देहाला दक्षतेचें होऊं (देत नाहीं) न देतां–देहाला जागृतावस्थेचें होऊं नच देणें करून असतो. सुखदुःख–सुखदुःखें–परि भोगी = सुखदुःखाची परी (पूजा, साकल्य, आलिंगन, लक्षण, निरसन) भोगीत असतो, भोगतो. उत = खरेंच, उलटपक्षीं, आणि, प्रश्न, विचार, पादपूरण, अत्यंत. (उताहो = किंवा उत+आहो) (५४).

इ = मदन, २ ही संख्या. ई+आ = आई = शरण जाणें, जाणें. ई = जाणें, इच्छिणें, फेकणें, खाणें. ईंद्रियांच्या = इंद्रियाच्या = मन, रेत, शुक्र, कर्माचें किंवा ज्ञानाचें साधन,–(हात, पाय, डोळे इत्यादि–). गांविं = इंद्रियांच्या वस्तीचें ठिकाण, क्षेत्र, इंद्रियांना लागून असलेली सीमा. नेणिजे = जाणणें नाहीं, तत्त्व कळणें, जाणीव, का माहित असणें नाहीं. ऐसा व्यापार जो निपजे–(उत्पन्न होतो) = असा जो उद्योग किंवा क्रिया उत्पन्न होते. तो केवळ मानसिक–मानसाचा–म्हणिजे गा = तो फक्त मनाचा म्हणावा (५५). परि कर्मातें न बांधजति = परी कर्में तेणें न बंधिजति = पण कर्मानें, कर्माला ते बांधले जात नाहींत. संगती सांडिलि = देहबुद्धीचें होणें जें, तें नाहीं, तें सांडण्याचें केलें : देहसंबंध दवडिला. अहंभावचि = अभिमानाची, [अहं, मी, (अस्मद्) अहंमति = गर्व (वे.) अज्ञान]. योगियें–योगिया = कर्मयोगी निष्काम असा, कर्मफलाभिलाषी नच असा (५६). आत्मा–आतां : जाल्या–जाहलिया–जाहालिया : भ्रमहत = भ्रांतिव्याप्त, भ्रमिष्ट, भ्रमयुक्त. विकळ दिसे = कलाहीन, मेळ नाहीं असें, अव्यवस्थित. आत्मा झाला भ्रमहत = आत्मा भ्रमानें व्यापलेला–आत्मा भ्रमानें भारलेला–व्यापलेला–आत्मा, सर्व विश्वांत असणारें चेतनतत्त्व–भूतमात्रांत असणारें चेतनतत्त्व, जीवात्म्याची दिशाभूल, आपण कोण आहों यासंबंधींची दिशाभूल–देहबुद्धीच एक परिणमून आहे. असंग आत्मापरमात्म्याची जी सत्ता तिजमुळें चैतन्यच एक सर्वथा व्यापून आहे. देहास असें जें व्यापून असणें तेथें

बुद्धीची जाणीवच मुळीं भ्रम घेऊन आहे (५७). "वो" शब्द = 'वो' मुखानें देत आहे-'वो' म्हणत आहे तोंडानें, पण तें 'ओ' म्हटल्याची जाणीव, जागतेपण ज्ञान नाहीं, पण मन कुठेंही ठिकाणींच नाहीं-तें जाग्यावरच नाहीं (५८). काजेविण = कामकाजाशिवाय जें मोकळेंच, असें जें कांहीं शून्यतेचें, तें कारणधर्माचें, कारणशरीराचें अज्ञान सुप्तताच जशी-जागा आहे पण मनच ठिकाणावर नाहीं-निद्रिस्तच जसा, असें जें कांहीं एक नुसतें कर्म-क्रिया इत्यादि तें कर्म इंद्रियांचे समजावें, जाणावें. कारण-करणें. जाण-जाणे (५९).

(ज्या कर्मासंबंधीं जागतेपण नाही, ज्ञान नाहीं, तेथे ओ म्हटलें तरी तसें बोलल्याची मुळींच जाणीव नाहीं, असें तें कर्म इंद्रियांचे केवळ व) आतां बुद्धीचे तें कर्म कसें तर जें सर्वत्र जाणतें असें, तें ओळख, असें श्रीहरी अर्जुनास म्हणत-सांगत आहेत : येथें ओळखीचें महत्त्व सर्वांत जास्त. कारण जें कांहीं स्थूल सूक्ष्म कारण, ह्या देहामध्यें स्थूल तो वापरला जाणारा, सूक्ष्म तो वासनात्मक लिंगाचा-तेथीलची ती व्यवस्था मात्र सत्तेवरच होणारी अशी-तेथें कामाशिवाय जें कांहीं कारणदेहाचें अज्ञान, सुप्तता तें इंद्रियांचे केवळ असें होय-व्यवहारामध्यें ह्याचें अतिशयतेचें महत्त्व : सत्ताच कीं ती सर्वेश्वराची, कर्मधर्माची मोजदाद होणारी. ती येथें ओळख असावी-धर्मदृष्ट्या तेथें ब्राह्मणसेवा, अध्यात्मसेवा, यात्रा वगैरेंनीं ती संयुक्ततेची व्हावींच, हें ज्याचें त्यानेंच समजावें, जाणावें असें आहे. वोळख-वोळखे (६०). कर्मे-कर्म (६१). बुद्धीची पै ठाउनि-बुद्धिची पै ठाउनि-बुद्धिचिये ठाऊनि देही = पिंडाची गोष्ट-व्यष्टि-बुद्धिस्थानापासून तो देहापर्यंत : : समष्टि = ब्रह्मांडाची गोष्ट-महत्तत्त्वापासून तृणापर्यंत = बुद्धिपासून देहापर्यंत ज्याला अहंकाराची आठवण-से-नाहीं. कर्मे-कर्म (कर्मे करितो). चोखाळले = शुद्ध झालें, कसास उतरलें. (चोखाळ = सोनें) (६२). करितेनिविण-करितेन विण कर्म। तेंचि ते निष्कर्म। = देहाभिमानावांचून जें कांहीं कर्तृत्वाचें होणें, तेथं कर्तृत्वाचा अभिमान-अहंमन्यता-सोडून केलेलें तें निष्कर्म होय. गुरुगम्य सवर्म-सुवर्म जे, ते जाणति = गुरुकृपेनें-गुरुच्या पावण्यानेंच-प्रसादानें समजणारें-जाणिवेस येणारें तें सवर्म-गुरु आश्रयसहितेचे असणारे-जो ते-ते जाणतात (६३).

शांत = सौम्य वृत्तीस भरती आली आहे व आतां : (शांतः शमितः शमनं प्रापितस्य शान्तः). भरितें = भरति, पूर, चढ, नवेंपण, दुणेहितरि. पात्र = विद्यापात्र, गौळण, विद्यावंत. (हरिचे विद्यावंत झालो रे आम्ही। जाऊनि पंढरपुरी साहिलो रे) = पान = पात्रामध्यें, पानामध्यें. [चप्पल, रस, सूत, पारद, इति, पारदस्य। एते पंचविषया इति गोचरा इति इंद्रियार्था-रूप, शब्द, गंध, रस, स्पर्श-] रस = (नऊ रस), आवड, प्रेम, अनुराग, सौंदर्य. नऊ रस = शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शांत. रस ज्येष्ठ = मधु रस, शृंगार रस. सांडिताहे-सांडित आहे = सोडून जात आहे : : पात्रांतें-पात्रांत : : बोलावे तें-बोलवले-(तुज) = बोलास आलें आहे. बोलापरौतें बोलणें = वाचातीत, बोलण्यापलिकडचें बोलणें, तें शब्दाच्या पलिकडचें. बोलवले = बोललें गेलें, बोलणें अर्थ दर्शविलें गेलें-जात आहे.-(पण तें ऐकण्यास अधिकारी ते कोण ते सांगतों) (६४). इंद्रियांचा (इंद्रिय = ज्ञानाचें साधन, कर्माचें साधन. इंद्रियग्राम = इंद्रियसमुदाय). पांगु = पराधीनतेची उणीव, उत्कट इच्छा, गरज, अपेक्षा, आशा, अगत्य. फिटला आहे = मनोरम काम, अभिलाषा नाहींशी झाली आहे. चांगु = चांगलें, उत्तम तऱ्हेनें. कथासंगु-कथालाग. तयांसिच परिसावया (ऐकायास) लागु-लाग = अधिकार, प्रयत्न, खटपट, पाठलाग, सामर्थ्य, शक्ति. आथि = आहे. पांगु-पांग. लागु-लाग. चांगु-चांग (६५). येथें-येथ. म्हणौनियां-म्हणउनिया. श्लोकसंगतिभंगु = श्लोकांचें संगतवार असणें जें येथें बिघाड होईल, भंग होईल. कथासंगु न संडी = कथेचा संदर्भ-संबंध सोडूं नको. अतिप्रसंगु असो = हा विषयांतराचा प्रसंग असो (६६). मना कुहाडें-कुवाडें = कठिण, जड, अवघड; आकळितें-आकळितां = आकळण्यास, आवरण्यास, आकळत नाहीं. घांगुसितां = शोधितां. बुद्धि-बुद्धिचि-बुद्धिसि = मतीस, धीस. नातुडे = सांपडत नाहीं. ते दैवाचेनि सुरवाडें = दैवच देव विसांव्याचें, तेथें दैव अनुकूल-सुरवाड प्रफुल्लितपणाच. सांगावें-सांगवले-तुज = सांगावेसें आहे (६७).

शब्दातीत स्वभावें = सहजच कीं वर्णन करण्यास अशक्य. तें बोलींचि जरि फावे = बोलण्याच्या आटोक्यांत येतें, बोलण्याचें स्पष्ट करितां येतें. आणिकें काय करावें = दुसऱ्या तिसऱ्या गोष्टी काय करायच्या आहेत. कथा सांगे = आणीक कशासही नको म्हणून कथाच ती सांगण्याचें कर (६८). हातिशय–हा आर्ति-विशेष = इच्छेचें विशेषत्व = मनोरथ. श्रोतियांचा–श्रोतयांचा = शिष्याचा, श्रोत्याचा, ऐकणाऱ्याचा–शिष्याचा हेतु विशेष कळकळीचा (आर्तिचा). (अतिशयित = अतिनिद्रित). दोघांचा संवाद परिसा परिसोनि = श्रीकृष्ण व अर्जुनाचा संवाद ऐकून ऐका–ऐकलेचि चित्त देऊन ऐका = लक्ष्य देऊन ऐका. परियसणें = ऐकणें. परिस = पेक्षां, इन. हातिशय = अभिप्राय, अतिशय विपुल आशय (६९). प्राप्ताचें–योग्याचें–ध्येय मिळविलेल्याचें, गांठलेल्याचें लब्धाचें–चिन्ह = प्राप्तीच्या आप्ताचें लक्षण, धोरण, ठसा, खूण. पुरतें = इत्थंभूत (पुरतः = अग्रभागीं, समोर). निरुतें = खरोखरीचें, खरें. चित्त देईं = लक्ष दे. प्राप्तम् = लब्धम्। आसादितम्। भूतम्। आप्तवाच् = वेदश्रुतींचें प्रमाणभूत वचन (७०).

पाहा कीं, बुद्धीची भाषा जाणत नाहीं, मनाचा अंकुर उगवला नाहीं, असें जें कांहीं व्यापार तें शरीर म्हटलें. (५१)

हेंच मराठीनें ऐकायचें तर, जशी का बाळकाची चेष्टा (हालचाल) तशीं कर्में केवळ तनूनेंच योगी करीत असतात. (५२)

यावर मग पांचभौतिक संचरलेलें तें शरीर जेव्हां निजलेलें असतें, तेथें स्वप्नामध्येंच जसें का असें मन एकलेंच राहाटत असतें. (५३)

पार्था! धनुर्धरा!! नवल तें ऐक कीं, ह्या वासनेचा संसार तो देही आत्म्यास तर उजगरा होऊं नच देतां सुखदुःखभोगच तो इंद्रियांच्या गांवीं नच जाणला जाणारा– (५४)

असा जो व्यापार निपजतो, तो केवळ मानसिक म्हटला. (५५)

योगी तोही करतात, पण कर्मानें बांधले जात नाहींत; कारण काय तर देह अहंभावाची संगती त्यांनीं सोडलेली, सांडलेली असते म्हणून. (५६)

आत्मा भ्रमहत झल्यास पिशाच्चयाचें चित्त तसें इंद्रियांचें विकळ तें चेष्टित आहे असें दिसतें. (५७).

स्वरूप पाहाते, देखते, आळविलेलें ऐकते, 'वो' 'आ' शब्द मुखानें बोलणें पण ज्ञान नाहीं (जाणीव नाहीं, जाणतेंपण नाहीं). (५८)

कारणाशिवाय जें का कारण (कामकाजाशिवाय जें कारण होतें) तें कर्म केवळ इंद्रियांचें होय. (५९)

मग सर्वत्र जाणतें असें जें कर्म, तें बुद्धीचें खरोखरीचें असें वोळख, असें श्रीहरी अर्जुनास म्हणत आहेत. (६०)

ती बुद्धि पुढें करून, तेथें धुरें करून, चित्त देऊन कर्में करितात, पण ते कर्मापासून मुक्त आहेत असे दिसतात–जे का बुद्धीच देही पैं ठाऊनि, स्थिर करून– (६१)

देही असतात–त्या अहंकाराची तर त्यांना आठवणच मुळीं नाहीं व म्हणूनच कीं, ते कर्में करितांना अनुभवानें शुद्ध झाले, चोखाळलेले होय. (६२)

फलेच्छा, अहंभाव सोडून जें कर्म घडतें, तेंच निष्काम कर्म, त्याचा गुण तें नैष्कर्म्य, तें गुरुकडून कळण्यास योग्य आहे, असें मर्म जाणणारे ते जाणतात. (६३)

आतां शांतरसास पूर आला आहे ; (नदीचें पात्र) नदीच्या पात्राची अरुंदि (पुरामुळें) त्याचमुळें पाणी बाहेर टाकलें जात आहे, वाहत आहे. जें का वाचातीत–वाचेनें न बोलतां येणारें–तें बोलतां आलें, बोलणें शक्य झालें. (६४)

इंद्रियांचा पांग फिटला आहे, ज्याचा चांगल्या तऱ्हेनें तेंच येथें ऐकण्याचा लाग होतो. (६५)

अतिप्रसंग, पाल्हाळ असा कथासंग, सूत्र न सांडतां असावें, कारण श्लोकसंगती भंग होईल म्हणून. (६६)

जें मनास आकळितें, असें तें कोडें शोधलें असतां बुद्धीस सांपडत नाहीं, तें दैवाच्या अनुकूलतेमुळें तुजला सांगवलें. (६७)

जे स्वभावेंकरून शब्दातीत, ते जरी बोलीच फावले, सांपडले, तर उत्तम झाले, तेथें आणीक तें काय करावयाचें आहे, म्हणून कथा सांगण्यास लाग– (६८)

हाच आर्तीचा विशेष त्या श्रोतयांचा, असें जाणून श्रीनिवृत्तिदासांनीं म्हणूं केलें कीं, दोघांचा, त्या श्रीकृष्ण व अर्जुनाचा तो संवाद ऐकून ऐकावा. (६९)

यावर श्रीकृष्ण पार्थास म्हणतात, आतां पुरत्या अशा प्राप्ताचें चिन्ह तें तुजला सांगेन, चित्त देऊन ऐस. (७०)

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥**

[युक्त = ईश्वरार्थ कर्म करणारा–सिद्ध, व्रतस्थ, निपुण, योगी, न्याय्य, जोडलेला, सहित असलेला. नैष्ठिकीम् = ज्ञाननिष्ठेनें प्राप्त होणाऱ्या–संन्याशाची : : शन्तिम् = मनोजय, समाधान, मंगल, चित्ताची स्वस्थता. (आप् = मिळविणें, पोंचणें, व्यापणें). आप्नोति = मिळवितो, व्यापतो, समाधानास पावतो. अयुक्तः = मनानें अशांत व अस्थिर बुद्धीचा. कामकारेण = स्वेच्छाचरणामुळें, वासनाप्रेरित म्हणून. फले सक्तः = कर्मफलाविषयीं आसक्त झाल्यानें. निबध्यते = बांधला जातो.]

**अन्वय :** युक्तः कर्मफलं त्यक्त्वा नैष्ठिकीम् शान्तिमाप्नोति, अयुक्तः कामकारेण फले सक्तः निबध्यते ।

**अर्थ :** फलाचा त्याग केल्यानें, योगनिष्ठेनें प्राप्त होणारी शांति (अमृतत्व) मिळते. अयुक्तः – चंचल बुद्धीचा मनुष्य कामवासनाग्रस्त झाल्यामुळें फलासक्त होत्साता कर्मबंधनानें बद्ध होतो (१२).

**तरि आत्मयोगें आथिला । जो कर्मफळासि विटला ।**
**तो घर रिघोनि वरिला । शांति जगिं ॥ ७१ ॥**

**येर कर्मबंधें किरिटी । अभिलाषाचिया गांठी ।**
**कळासला खुंटी । फळभोगाच्या ॥ ७२ ॥**

आत्मयोगें आथिला = आत्मसंगतीनें योग्य सुखरुप झाला–आत्मज्ञानानें भाग्यवान–आत्मप्राप्तीची जोड जो ज्ञानयोग त्यानें सुसंपन्न झाला. कर्मफळासि विटला = कर्मफळाचा वीट आला–वैराग्य आलें. शांति घर रिघोनि वरिला = तो जगिं–जगामध्यें–शांतीनें आपण होऊन त्याच्या घरीं शिरुन त्याजला वरणें होतें–तो शांतीनें आपण होऊन वरिला होतो–शांति त्याच्या घरीं शिरते–रिघते (७१). कर्मबंधें = कर्मबंधनानें धरल्यामुळें. अभिलाषाचिया = इच्छेच्या, प्रेमाच्या. गांठी = पदरीं, पदरींच गांठभेटीचा झाल्यानें. फळभोगाच्या खुंटी कळासला = फळइच्छेच्या गांठीनें फळभोगाच्या खुंट्याला बळकट बांधला जातो. कर्मफळच त्याच्या गांठीं बांधल्यामुळें तो फळभोगाच्या खुंट्यासच बद्ध केला, खिळिला, बांधला गेला. कळा–स्थिति–प्रतिष्ठा, शोभा (७२).

आत्मयोगानें आहे-आत्मप्राप्ति जोड, ज्ञानयोगानें जो आहे, जो सुसंपन्न झाला–जो कर्मफळास विटला–ज्यास कर्मफळाचा वीट आला–वैराग्य झालें, शांतीनें आपण होऊनच रिघावा करून त्यास वरिलें कीं– (७१)

दुसरा हे किरीटी, इच्छेच्या, अभिलाषेच्या, कर्मबंधाच्या गांठीमुळें फळभोगाच्या खुंटीवरच कीं, खिळिला, कळासला होतो. (७२)

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

[ मनसा सर्वकर्माणि संन्यस्य = मनानेंच सर्व कर्मांचा–नित्य–नैमित्तिक इंद्रियांचीं कर्में–त्यांचा त्याग केल्यानें. वशी = जितेंद्रिय, (वशिन् = समर्थ, स्वतंत्र, स्वाधीन, जितेंद्रिय, नम्र, वश). सुखं अस्ति = सुखानेंच कीं असतो, राहतो. नवद्वारे पुरे = देही = (आत्मनिष्ठ) = नऊ दरवाज्यांच्या पुरामध्यें–देहामध्यें. न कुर्वन् न कारयन् एव = स्वतः कांहीं करीत नाहीं, करवीत नाहीं. ]

**अन्वय :** वशी सर्वकर्माणि मनसा संन्यस्य सुखं आस्ते, नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन् न कारयन् ।

**अर्थ :** जितेंद्रिय पुरुष सर्व कर्मांचा मनानेंच संन्यास करून स्वतः कांहीं न करितां किंवा न करवितां ह्या नऊ द्वारांच्या नगरामध्यें म्हणजे देहामध्यें सुखानें शांत असतो. (नऊ द्वारें = दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, मूत्रद्वार व गुदद्वार) (१३).

**जैसा फळाचीये हांवे । अैसे कर्म करि अघवें ।**
**मग न किजेचि येणें भावें । उपेक्षी जो ॥ ७३ ॥**

**तो जयाकडे वास पाहे । तेउति सुखाची सृष्टि होये ।**
**तो म्हणे तेथें राहे । महाबोध ॥ ७४ ॥**

**नवद्वारें देहिं । तो असतचि परि नाहीं ।**
**करितन्चि न करि कांहीं । फळत्यागि ॥ ७५ ॥**

हांव = आशा, इच्छा. अैसे–तैसे. फळाचीये हांवे = फळाच्या हांवेनेंच, आशेनें, इच्छेनें जसा का. कर्म करि अघवें = सर्व कर्म करतो. न किजेचि येणें भावें उपेक्षि जो = कांहींच करणें नाहीं अशा भावानें जो त्या कर्माची उपेक्षा करतो. भावें–भावानें = अर्थानें, हेतूनें, इच्छेनें, भक्तीनें, विश्वासानें (७३). वास = वाट = वास, गृह, स्थान, वस्त्र. महाबोध = महत्तत्त्व–श्रेष्ठ महत् + बोध = ज्ञानविचार, बुद्धिजागृति, उपदेश, उमलणें. तो जयाकडे वास पाहे = (असा तो त्यागी, निष्काम कर्मयोगी) तो, तो जिकडे पाहील तिकडे म्हणून, तो ज्या वाटेस पाहत आहे ती. तेउति सुखाची सृष्टि होये = तेथ तिकडची सृष्टि सुखमय होते (७४). नवद्वारें देहिं–नवद्वारदेहि. रसनेंद्रिय दोहींकडे म्हणजे कर्मेंद्रियांमध्यें तसेंच ज्ञानेंद्रियांमध्यें असल्यामुळें देहाचीं नऊ द्वारेंच सांगितलीं–म्हटलीं. नवद्वारें देहिं असतचि तो (परि तेथें नसताच जसा असा) नाहीं, नसतो–फलत्यागी तो कर्म करीत असतांनाच कांहींहि करीत नाहीं असा करून अकर्ता समजावा (–कर्मफळच नाहीं म्हणून त्यास बंधन नाहीं) (७५).

जसा फळाच्या हांवेनें करीत आहे असें अवघें सर्व कर्म करतो व मग नच करावें अशा भावानें उपेक्षा करतो जो. (७३)

तो ज्याकडे पाहतो तिकडे सुखाची सृष्टि होते. तो म्हणें राहे तेथेंच महाबोध राहतो. (७४)

नऊही द्वारें देही आत्मा तो देहानें आहेच आहे, पण कर्म करीत असूनही कांहींहि करीत नाहीं, फलत्यागी कर्ता तो. (७५)

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**

[प्रभुः लोकस्य कर्तृत्वं–कर्माणि न सृजति = अवश्य कर्मे, इष्ट असलेलीं कर्मे उत्पन्न करीत नाहीं. न (च तत्र) कर्मफल संयोगं तु स्वभावः प्रवर्तते = तिन्ही लोकींच्या–लोकांच्या–मनद्वारा, बुद्धिद्वारा, इंद्रियद्वारा–कर्तृत्व म्हणजे कर्तृत्वाभिमान उत्पन्न करीत नाहीं. कर्तृ = करणारा, ईश्वर, ब्रह्मदेव, असा कर्ता–कर्तेपणाचा, मीपणा, प्रमाण, ज्ञानगर्व–उत्पन्न करीत नाहीं. कर्माच्या फलाचा संयोगही (संच, एकोपा, एकत्व, जोडणें) तेथें उत्पन्न करीत नाहीं, तेथें एक अविद्यारूप माया स्वभावधर्म–स्वभावच (अध्यात्म) = प्रकृति, मूळधर्म, मायाच (आत्मसत्तेनेंच सर्व कर्मे प्रकृतीकडून होतात). सर्व प्रकृतींत वर्तणें करते. प्रभु = सर्वप्रकाशक आत्मा, नायक, नेता, प्रभु, अधिप, स्वामी, ईश्वर.]

**अन्वय :** प्रभुः लोकस्य कर्तृत्वं न सृजति, कर्माणि न सृजति, कर्मफलसंयोगं न सृजति, स्वभावस्तु प्रवर्तते ।

**अर्थ :** मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादिकांची स्वाभाविक प्रवृत्ति असते. देहाधिपति जो आत्मा तो लोकांचें देहरूपी नगरांतील बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादिकांचें कर्तृत्व, कर्म किंवा कर्माच्या फळाची जोड म्हणजे प्रवृत्ति उत्पन्न करीत नाहीं (१४).

**जैसा किं श्रीसर्वेश्वरु । पाहिजे तंव निर्व्यापारु ।**
**परि तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥**

**आणि कर्ता ऐसें म्हणिपे । कर्मि तरि कवण्याहि लिंपे ।**
**जे हातापावोनि न शिंपे । उदासवृत्ति ॥ ७७ ॥**

**योगनिद्रा तरि न मोडे । अकर्तेपणा सळ न पडे ।**
**परि महाभूतांचें दळवाडें । उभारिलें ॥ ७८ ॥**

**जगाचा जीवीं आहे । परि कवणाचा कांहिं नोहे ।**
**जगचि हें होय जाये । तो शुद्धिहि नेणे ॥ ७९ ॥**

किं श्रीसर्वेश्वरु–का सर्वेश्वरु : श्रीसर्वेश्वर = सर्व कांहीं ईश्वर आहे–सर्व नियंता परमेश्वर असा भाव, तो तर कांहींच करणारा नव्हें; साक्षीभूत असा, कांहीं करीत नाहीं असा; तो तर निर्व्यापार म्हटला तरी तोच पाहावा, देखावा तर तोच त्रिभुवनाचा विस्तार रचतो. निर्व्यापारु = अकर्ता [निर् = नकार, निश्चय, बाहेर, दूर, निषेध, त्याग. व्यापार = उद्योग, प्रयोग, धंदा, खटपट, परिणाम]. विस्तारु = जगाचा पसारा, वाढ, फैलाव, रुंदी, (झुडुप बेट) सर्व हकिकत. त्रिभुवन = भुः । भुंवः । स्वः । – स्वर्ग, मृत्यु, पाताळ. भुवन = जगत्, लोक, स्वर्ग, पाणी (७६). कर्ता म्हणिपे = कर्ता म्हणावा तर. कर्मि तरि कवण्याहि न लिंपे (शिंपे)– कोणत्याहि कर्मांत शिंपत–लिप्त होत नाहीं–कारण–जे उदासवृत्ति–हातापावोनि न लिंपे–जे का उदासपणाची वृत्ती ती हातपाय लिंपत नाहीं–घर बांधूनही (हातापावोनि) त्याच्या हातापायाला चिखल लागत नाहीं. कर्मि तरि कवण्याहि न शिंपे–तरी कवणें कर्मी न शिंपे : : हातापावोनि न लिंपे सिंप उदासवृत्ति–हातुपावो न लिंपे उदासवृत्तीचा (७७). योगनिद्रा तरि न मोडे = (योगनिद्रेनें डोळे मिटलेला)–परमेश्वराची योगनिद्रा मोडत नाहीं. अकर्तेपणा सळ–सळु न पडे–घडे = अकर्तेपणास न्यूनता, कमीपणा, धक्का येत नाहीं. सळु = भंग. दळवाडें = समुदाय. परि महाभूतांचें दळवाडें उभारिलें = उभारी–भलें–वर (पंच देवांचे/पंचमहाभूतांचे) महाभूतांचे समुदाय भले चांगलेच कीं असे तेथें उभारण्याचे केलेले होय–दृढता [ = चिकाटीचे, पक्के, भरीव, निष्ठुर, निश्चित–(लोहकिल्लाच जसा–)]. स्थिरताच ( = शाश्वत, निश्चल–देव, पर्वत, वृक्ष, मोक्ष, पृथ्वी–

धीराची केली, दमदार केली) एक तेथें (७८). जगाचा जीवि आहे = जगाचा जीवच जसा, असा जगाच्या जीव प्राणांमध्यें आहे. परि कवणाचा कांहिं (कहीं) नोहे (नाहे) = पण कुणाचाहि काहीं एकाग्रापणाचा नाहीं. जगचि हें होय जाये तो शुद्धिहि नेणे = जग तर हें होत जात आहेच, पण तो जर जसा का शुद्धीनें, खरेपणानें कांहींच नेणता असा तर-कांहींच मुळीं जाणता असा नव्हें (७९).

जसें सर्व नियंता परमेश्वर, सर्वेश्वर, पाहावा तो साक्षीभूत असा, कांहीं करीत नाहीं असा (निर्व्यापार); पण तोच स्वर्ग, मृत्यु, पाताळ, इत्यादींचा विस्तार, जगाचा पसारा रचित असतो कीं- (७६)

कर्ता म्हणावें तो कोणत्याही कर्मामध्यें लिंपत नाहीं; उदासवृत्तीचा असल्यानें त्याचे हातपाय वगैरे मुळींच लिंपले-कर्मांनीं सिंपिले-होत नाहींत. (७७)

योगनिद्रा मोडत नाहीं, अकर्तेपणास तळमळ नाहीं (तळ सांपडत नाहीं), पण महाभूतांचे समुदाय भलेपणानें उभारतो. (७८)

जगाच्या जीवीं आहे, पण कुणाचाहि कांहीं नव्हे. जग हें होत जात आहे, पण तो ह्यासंबंधीं वार्ताही जाणत नाहीं. (७९)

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥ १५ ॥**

[प्रभु = सर्वप्रकाशक आत्मा, बलिष्ठ, व्यापक, शक्तिमान ईश्वर, शंकर, आकाश, आत्मा). विभुः = सर्वगामी आत्मा. न आदत्ते = घालवीत नाहीं, स्वीकारीत नाहीं. कस्यचित् पापं = कुणाचेंहि पाप का पातक. न आदत्ते न च सुकृतं एव कस्यचित् = कुणाचेंही पुण्य दूर करीत नाहीं, घेत नाहीं. पण परंतु-ज्ञानं अज्ञानेन आवृतं-सदुसद्विवेक ज्ञान, जाणणें, तत्त्व कळणें, जाणीव-ज्ञान, विवेक, विज्ञान तें अज्ञानानें आवृत म्हणजे व्याप्त, पूर्ण झांकलें आहे. तेन = त्यायोगें. जंतवः मुह्यन्ति = प्राणी । जीवात्मा । कृति । सर्व जीव मोह पावतात-गोंधळतात, चुकतात, मूढ होतात, भूल पाडिले होतात.]

**अन्वय :** विभुः कस्यचित्पापं न आऽऽदत्ते, कस्यचित्सुकृतं चैव न आऽऽदत्ते, अज्ञानेन ज्ञानं आवृतं, तेन जन्तवः मुह्यन्ति ।

**अर्थ :** त्याचप्रमाणें हा विभु-आत्मा-कोणाचेंहि (बुद्धि, मन इत्यादिकांचें) पाप किंवा पुण्य ग्रहण करीत नाहीं. ज्ञान-सदुसद्विवेक-आत्म्याविषयींच्या अज्ञानानें आच्छादित असल्याकारणानें, आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें सामान्य जन मोह पावतात (१५).

**पापपुण्यें अशेषें । तें यापासींच असत न देखे ।**
**आणि साक्षिही हो न ठाके । येरि गोठि कायसि ॥ ८० ॥**
**पैं मूर्तिचेनि मेळें । तो मूर्तचि होऊनि खेळे ।**
**परि अमूर्तपण न मैळे । दादुलेयाचें ॥ ८१ ॥**
**तो सृजी पाळि संव्हारी । ऐसें बोलती चराचरिं ।**
**तें अज्ञान गा अवधारिं । पांडुकुमरा ॥ ८२ ॥**
**तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं रातिचें सैरें फिटे ।**
**मग अकर्तृत्व प्रगटे । ईश्वराचें ॥ ८३ ॥**

पापपुण्यें अशेषें-अशेखे = सर्व पापपुण्यें तीं. ते (यापासींच-) यासीच-पासींच असत-असतु न देखे = ह्याजवळ असतांही-असूनही तो पाहतच नाहीं. साक्षिही हो-होऊ-न ठाके = साक्षी = पाहणारा (परमात्मा)

द्रष्टा—ही होऊन असत नाहीं, राहत नाहीं. कारण हा वृत्तिशून्य, तेथें साक्षीपणाची वृत्ति कसची असणार! वृत्ति = सेवा, अर्थबोधक शक्ति, क्रिया, स्थिति, व्यवहार, मनःस्थिति. येरि गोठि-गोष्टी—कायसि=दुसरी ती गोष्टच नाहीं (८०). मूर्तिचेनि मेळें—मुळें = सगुण स्वरूपाच्या आश्रयानें, संघात देह व इंद्रियांचा ह्यामध्यें—देहाच्या संगतीनें. मूर्तचि होऊनि खेळे = व्यक्त, दिसणारा, सगुण होऊन क्रीडा करतो. अमूर्तपण न मैळे = पण अव्यक्तभाव विकार पावत नाहीं, मळत नाहीं—ह्या इंद्रियाचा व देहाचा स्वामी असलेल्या प्रभूचें निराकारत्व मोडत नाहीं, निराकारपण बिघडत नाहीं. दादुलेयाचें—दादुलयाचें = प्रभूचें, स्वामीचें, सर्वसमर्थाचें (दादला—नवरा) (८१). बोलती—बोलती जें=जें कांहीं बोलिलें जातें. पांडुकुमरा—पंडुकुमरा=अर्जुना. सृजी=उत्पन्न करतो. पाळि = रक्षितो, पोसतो, वाट पाहतो. संव्हारी = गोळा करतो, प्रळय, अस्त्र परत घेणें जें—संक्षेप. चराचरिं = जगामध्यें, सर्व वस्तूंमध्यें. अस्त्र = शस्त्र, मंत्रपूर्वक शस्त्र, धनुष्य, अस्त्रविद्या (८२). समूळ = मूळासहित. रातिचें—भातिचें—सैरें—मसैरें फिटे—मसैरें = काजळी, अधिकार. अकर्तृत्व प्रगटे = अकर्तेपण. ईश्वराचें = मज ईश्वराचें (८३).

अशेष सर्व पापपुण्यें पासींच असून पाहत नाहीं. साक्षी होऊन न ठके—दुसरी ती गोष्ट कसची मग तेथें विचारावयाची ती! (८०)

सगुण रूपाच्या आश्रयानें (मूर्तिचेनि मेळें) तो सगुण, व्यक्त, दिसणारा होऊन खेळतो, क्रीडा करतो. पण त्या स्वामीचे-दादल्याचे अव्यक्त भाव मळत नाहींत, विकार पावत नाहींत. (८१)

तो सृजतो—उत्पन्न करतो, पाळतो, संहार करतो, असें चराचरामध्यें बोलतात जें कांहीं—तें तर निव्वळ हे पांडुकुमरा, अज्ञान समज गा! (८२).

तें अज्ञान जेव्हां समूळ तुटतें, तेव्हां अज्ञानरात्रीचें तें काळें—शाईचें तें—फिटतें, नाहींसें होतें, व मगच ईश्वराचें अकर्तृत्वपण प्रगट होतें. (८३).

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

[परम् = ब्रह्म, परलोक, परमात्मा, विष्णु, मोक्ष. आदित्यवत् = आदित्य = सूर्यवंशीय, देव, सूर्य. (सूरसूर्यर्यमादित्यद्वादशात्मादिवाकराः । भास्कराहस्करब्रध्नप्रभाकरविभाकराः ॥ भास्वद्विवस्वत्सप्ताश्वहरीदश्वोष्ण-रश्मयः । विकर्तनार्कमार्तंड मिहिरारुणभूषणः ॥ इत्यादि (३७). ज्ञानसूर्य = सूर्यासारखें ज्ञान. प्रकाशयति = (जाहीर—उघड करणारा, शोधकपणें प्रकाशणारा) दाखवितो, प्रकाशित करतो. तत् = ब्रह्म, अनुभविलेलें.]

**अन्वय :** येषां आत्मनः ज्ञानेन तु तदज्ञानं नाशितं तेषां आदित्यवत् ज्ञानं तत्परं प्रकाशयति ।

**अर्थ :** परंतु आत्म्याच्या यथार्थ ज्ञानानें ज्याचें अज्ञान नाहींसें झालें आहे, त्याचें तें उत्कृष्ट आत्मज्ञान सूर्याप्रमाणें, बुद्धि, मन इत्यादिकांना प्रकाशित करितें—निर्मळ करितें (१६).

**येथ ईश्वर एक कर्ता । ऐसें मानलें जरि चित्ता ।**
**आणि तोचि मी हें स्वभावतां । आधींचि असें ॥ ८४ ॥**

**ऐसेंनि विवेकें उदय चित्तिं । तयासी भेद कैंचा त्रिजगतीं ।**
**देखे आपलीया प्रतीति । जगचि मुक्त ॥ ८५ ॥**

**जैसि पूर्व दिसेचा राउळिं । उदयाची होय दिवाळी ।**
**किं येकीहि दिशा तये काळिं । काळिमा नाहीं ॥ ८६ ॥**

ईश्वर एक कर्ता = कर्ता करविता परमेश्वर-ईश्वर आहे. ऐसें मानलें जरि चित्ता = असें जरी का मानणें चित्तानें ( = लक्ष्यानें, बुद्धीनें, ज्ञानानें ) जें तेथें. तोचि मी हें स्वभावतां = तो स्वभावेंकरूनच, सहजपणेंच, मूळधर्म, माया, प्रकृतीत्रशेंकरून, स्वात्मकतेनेंच, स्वसिद्धतेवरच कीं, मूळचेंच कीं, कीं मी ना. आधींचि असें-आदीचि आहे = आधींच आहे (८४). ऐसेंनि विवेकें उदय-उदो-चिर्त्ति. उदो = उदय, जागेपण. चिर्त्ति = (चित्+मय = ज्ञानस्वरूप) लक्ष्य, बुद्धि, ज्ञान, विचार. (चित्त = चित्तम्। चेतः। हृदयम्। स्वान्तम्। हृत्। मानसम्। मनः। इति ७ चित्तस्य. भेद = भिन्न भाव, द्वैत. त्रिजगतीं = स्वर्ग, मृत्यु, पाताळ. प्रतीति = अनुभव, खात्री, विश्वास, आनंद. (आदौ ब्रह्माहमस्मि इति अनुभव. पश्चात् उदिते खलु इदं ब्रह्म—आचार्य उक्ति). जग = चर, जंगम, जग, देह. मुक्त = मोक्ष मिळालेले, आनंदित (८५). जैसि पूर्व दिसेचा राउळिं = दिशेच्या टोंकावरचा प्रदेश, क्षितिज, दिशांत. राउळ = देव, देऊळ, घर : उदयाचि होय-उदया येतांचि सूर्य-दिवाळी. उदयाचि = फलप्राप्ति, समृद्धि, उत्कर्ष. दिवाळी = लखलखाट, प्रकाश, आनंद. किं येकीहि = एकहि दिशा तये-तियेचि काळीं. दिशा = दिशेचा-टोंकावरचा, प्रदेश, क्षितिज, दिशांत. काळिं = वेळीं, कांहीं काळपर्यंत. काळिमा = काळोखा, अंधार (८६).

येथें ईश्वर एक कर्ता म्हटला-असें जरी चित्तानें मानलें व तोच मी, हें स्वभावेंकरूनच आधींची मी असलेला, अगोदरचा कीं- (८४)

अशा विवेकाचा चिर्त्ति उदय झाला त्यास त्रिजगतामध्यें मूळीं भेद कसचा तो! आपल्या अनुभवावरच कीं तो जग हें मुक्तच आहे असें पाहतो. (८५)

जसें पूर्व दिशेच्या क्षितिजावर उदयाची दिवाळी होते, तेव्हां तर एकाहि दिशेस मुळिंच काळिमा नाहीं, तेथें उदयच सर्व! (८६)

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

[तत् बुद्धया = (तत् = ब्रह्म. बुद्धि = बुद्धिर्मनीषाधीषणाधीः प्रज्ञाशेमुषीमती। प्रेक्षोपलब्धिश्चित्संवित्प्रतिज्ञप्तिचेतना ॥) बुद्धिब्रह्म, बुद्धयादिक ब्रह्म. तत् आत्मानः = (आत्मानः = "क्षेत्रज्ञ आत्मा पुरुषः" इति ३ शरिराधि दैवत. अतति इति आत्मा।) आपणब्रह्म, जीवब्रह्म, देहब्रह्म, जीवात्माब्रह्म, मनबुद्धिस्वरूप स्वभावधर्म चैतन्यब्रह्म. (ब्रह्म = आत्मायत्नो धृतिर्बुद्धि स्वभावो ब्रह्म च।) तत् निष्ठा = (निष्ठा = निष्ठा निर्वहणम् इति २ समे इति समानार्थे न तु समान लिंगे : निष्पत्तिर्निष्पादनं। नाशः अदर्शनम्। अन्तः प्रध्वंसः निष्ठा।) निष्ठा ब्रह्म, ब्रह्मनिष्ठ. तत् परायणा = (परायणम् = साकल्यवचनं पारायणम् इति। आसंगवचनं तुरायणम् इति। साकल्य = समग्रता, पूर्णता. आसंग = तल्लीनता, कर्तृत्वाभिमान. तुरायणम् = निःस्पृह, निरिच्छ. संग = संयोग, मैत्री, विषयासक्ति, एकत्र करणें. आ = आठवणीवजा उद्गार) ब्रह्मपरायण, परायणता ब्रह्माचे ठायीं. गच्छन्ति अपुनरावृत्तिम् = (गच्छन्ति = ब्रह्म पावतात, ब्रह्म होतात) पुन्हा जन्मास येणें नाहीं असें होतात. (अ+पुनर्+आवृत्तिम्). ज्ञान = ब्रह्मज्ञानानें. निर्धूत = नाशित. कल्मषा = पाप, डाग, घाण, गलिच्छता.]

**अन्वय :** तद्बुद्धयः तदात्मानः तन्निष्ठाः तत्परायणाः ज्ञाननिर्धूतकल्मषाः अपुनरावृत्तिं गच्छन्ति।

**अर्थ :** ज्ञानाच्या ठिकाणीं ज्याची बुद्धि जागी झाली आहे, ज्याचें ज्ञान आत्मभावनारूप झालें आहे, ज्याची ज्ञानावर अति निष्ठा व प्रीति आहे व ज्ञान हेंच ज्यांनीं आश्रयस्थान केलें आहे, आणि ज्ञानानें ज्यांचें सर्व पातक म्हणजे अंतःकरणांतील मळ धुऊन गेले आहेत, ते पुनर्जन्मरहित होऊन मुक्त होतात (१७).

**बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणाआपण ।**
**ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अहर्निशिं ॥ ८७ ॥**

**ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचया हृदया गिंवसित आलें ।**
**तयाचि समताद्दष्टी बोलें । विशेष कायी ॥ ८८ ॥**

**एक आपणपेंचि पां जैसें । ते देखति विश्व तैसें ।**
**हें बोलति कायसें । नवल येथ ॥ ८९ ॥**

**परि दैव जैसें कौतुकें । कहिंची दैन्य न देखे ।**
**कां विवेक हा नोळखे । भ्रांतितें जेविं ॥ ९० ॥**

**नातरि अंधकाराचि वाणि । जैसा सूर्य नेणें स्वप्नीं ।**
**अमृत नायके आपुला कानिं । मृत्युकथा ॥ ९१ ॥**

**नातरि संताप कैसा । चंद्र न स्मरे जैसा ।**
**भूतिं भेद नेणति तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥**

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान = आपणच ब्रह्म, अशा ज्ञानयोगासंबंधीं बुद्धीचा निश्चय झाल्यानें. ब्रह्मरूप भावी आपणाआपण = आपण स्वतःसच कीं ब्रह्मरूप मानतो, दिसतो, प्रकट होतो, असा ब्रह्मनिष्ठ ज्ञानी होतो. ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण = ब्रह्माचें ठायीं स्थिरता, दृढभक्ति, श्रद्धा, कौशल्य, निश्चय पूर्णपणें ठेवतो. तत्परायण = ब्रह्मतत्पर, ब्रह्मनिमग्न, ब्रह्म आश्रयणेंच एक. अहर्निशिं = रात्रंदिवस, अहोरात्र. (अहन्+निशं). ही ओवी एकाजनार्दनाची आहे, असें मानतात, समजतात–अशी समजूत आहे (८७). ऐसें = सर्वात्मभावाचें. ऐसें व्यापक ज्ञान भलें = असें भलेपणाचें ज्ञान जें व्यापक असें. जयांचया–जयाचिया–हृदया गिंवसित आलें = ज्याच्या हृदयास, छातीस, मनास, प्राणास, इच्छेस, प्रीतीस, जीवितरहस्यास शोधित आलें, हृदयीं स्फुरण पावलें (स्वतःसिद्ध तेंच ज्ञान). गिंवसित = शोधित. समताद्दष्टि = अभेद भावाची साम्य दृष्टि : समता–समत्व–एकरूपता–सादृश्य दृष्टि. तयाचि समताद्दष्टि बोलें = त्याची समताद्दष्टि ती सांग–त्याची दृष्टि समतेची अशी बोलिली. विशेष–विशेषूं–काइ = तेथें विशेष–शब्दमात्रेंकरून बोलण्यानें ते, विशेष गुण श्रेष्ठता ती–ती काय सांगूं ! (८८). एक आपणपेंचि पां जैसें–एक आपणपेंचि जैसें = एक स्वतः आपणच जैसे का. ते देखति विश्व तैसें = तसे ते विश्व देह पाहतात, देखतात. हें बोलति–बोलणें कायसें = असें हें शब्दाचें बोलणें बोलतात–सांगणें सांगतात–तें कांहींच नव्हें, पण. नवल येथ–एथ = इथें नवलच एक असें–नवल नवल असें आहे (८९). कौतुकें–कवतिके = सहज कौतुकानें. सुद्धां. कहिंची–कांहींच दैन्य न देखे = दीनवाणेंपणाचें दैन्य देखत–पाहत नाहींत. कां विवेक हा नोळखे भ्रांतितें जेविं = सारासार विचार, टांकी ही भ्रम ओळखीत नाहीं–भ्रमाची होत नाहीं (९०). नातरि अंधकाराचि वाणि–ना तरी अंधकाराची वानी. वानी = मासला, भेद, प्रकार. जैसा सूर्य नेणें–न देखे–स्वप्नीं = सूर्य स्वप्नींही जाणत नाहीं. अमृत नायके आपुला कानिं–अमृत नायके कानीं = कानींसुद्धां येत नाहीं कधीं अमृताच्या–. मृत्युकथा = मरणाची ती कथा की गोष्ट ती (९१). नातरि–हे असो ; संताप कैसा = जसा संताप (उष्णता, उष्मा) क्रोध, दाह, पश्चत्ताप. संताप = दाह, आग, पेटणें, वेदना, क्लेश, दुःख, क्रोध, पश्चात्ताप. संतापन = मदनबाण वि., दुःख, संतप्त होणें, पीडणें. चंद्र न स्मरे जैसा = चंद्र (= स्मरसख) मुळींच आठवित–स्मरत नाहीं, चिंतित नाहीं. भूतिं भेद नेणति तैसा ज्ञानिये ते = तैसे ज्ञानी ते (शहाणे ते, आत्मज्ञानी ते) भूतीं भेद जाणत नाहींत. भेद = फरक, बदल, भिन्न भाव, द्वैत, विघ्न (९२).

**बुद्धीच्या निश्चयानें आत्मज्ञान झाल्यावर आपणच आपणांस ब्रह्मरूप भावतों, मानतों, ब्रह्मनिष्ठाच कीं ती ब्रह्मनिष्ठ होण्यानें पूर्णपणें राखिली–सांभाळली व अहर्निशीं तत्परायणच कीं होऊन असलेला ! (८७)**

असें ( व्यापक ज्ञानं ) सर्वात्मभावाचें ज्ञान, व्यापकतेनें असलेलें तें-ज्याच्या, स्वतःसिद्ध तेंच ज्ञान हृदयीं स्फुरण पावलें, त्यास स्वतःसिद्ध तें ज्ञान शोधित आलें. त्याची साम्य दृष्टि अभय भावाची! आतां येथें शब्दांनीं विशेष तें काय सांगूं! (८८)

आपणच एक जसें, असें तें विश्व पाहतात-हें बोलतां कायसें नवल बरें येथें! (८९)

पण जसें कौतुकानें दैव कुठेंही दैन्य पाहत नाहीं, अथवा विवेक हा भ्रांतीस मुळींच ओळखत नाहीं! (९०)

अथवा अंधकाराची उणीव वाणी सूर्य स्वप्नींही (देखत नाहीं) जाणत नाहीं. मृत्युकथा ती अमृतानें आपल्या कानीं केव्हांही ऐकणें नाहींच! (९१)

अथवा संताप तो कसा असतो हें (चंद्र कांहीं स्मरत नाहीं) चंद्रानें स्मरणें नाहीं जसें, तसा ज्ञानीये ते भूतांमध्यें भेद नेणतात. (९२)

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

[(सम=सदृश, सद्, प्रामाणिक. दर्शिन्=पाहणारा, दाखविणारा, जाणणारा.) पंडितः = विद्वान, हुषार. विद्या=विद्या, ज्ञान, ब्रह्मज्ञान, शास्त्र. विनय=शिष्टाचार, नम्रता, नियमन, शिक्षा. संपन्न=निर्दोष, युक्त, समृद्धा, वैभवशाली, श्रीमान्. गवि=गाय, पृथ्वी, आई, दिशा, वाणी, डोळा, आकाश, किरण, इंद्रिय, सूर्यचंद्र, अग्नि, उदक, वज्र, पशु. हस्तिन्=हत्ती. शुनि=कुत्रा (शुनी=कुत्री). श्वन्=कुत्रा, श्वपच्, श्वच्, श्वपाक=चांडाल. श्ववृत्ति=सेवा.]

**अन्वय :** पंडिताः विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे, गवि हस्तिनि शुनि चैव श्वपाके च समदर्शिनः सन्ति ।

**अर्थ :** विद्याविनयसंपन्न अशा ब्राह्मणाच्या ठिकाणीं, गाई, हत्ती, कुत्रे व चाण्डाळ यांच्या ठिकाणीं ज्याची समदृष्टि असते तेच बुद्धियोगयुक्त होत (१८).

**मग मशक हा गज । किं श्वपच हा द्विज ।**
**पैल ईतर हा आत्मज । हें उरलें कें ॥ ९३ ॥**

**नातरि हे धेनु हें श्वान । येक गुरु येक हीन ।**
**हें असो कैंचें स्वप्न । जागतया ॥ ९४ ॥**

**येथ भेद तरि कें देखावा । जरि अहंभाव उरला व्हावा ।**
**तो आधींचि नाहीं आघवा । आतां वीषम कायी ॥ ९५ ॥**

मग मशक-मग हा मशक=माशी, चिलट. हा गज = हत्ती, ३० अंगुळें लांबी. किं श्वपच=चांडाळ, अंत्यज. द्विज=पैल=पलीकडचा. आत्मज=मदन, वंशज, पुत्र, कन्या. हें उरलें कें=असें उरत नाहीं (९३). हे धेनु=ही गाय, ही पृथ्वी, ही देणगी. हें श्वान=हा कुत्रा. येक गुरु=थोर एक. येक हीन=हीन एक निंद्य, न्यून. हें असो = असें हें असूंदेत. कैंचें स्वप्न = स्वप्नांतील भास, कसचें स्वप्नींचें पाहणें. जागतया = जाग्या माणसास, जागृताला (९४). येथ-एथ-भेद तरि कें-की-देखावा=येथें भेद तेव्हांच कीं पाहावा होतो जर का. जरि अहंभाव उरला व्हावा-ही आवा=अहंभाव-मीपणा उरला व्हावा का असेल पण. तो आधींचि नाहीं आघवा=तो तर अगोदरच कीं समूळच्या समूळ-आघवा-सर्व नाहींसाच झालेला. म्हणून येथें आतां-आतां विषम कायीं=विषम तें कसचें न् काय. विषम=देहभाव, भिन्नपणा, विरुद्धपणा, उंच, सखल, वक्र, प्रतिकूल, विपरित, दुष्ट, संकट, शोक, दुःख (९५).

मग हें घुंगुरटें–चिल्ट, हा हत्ती कीं चांडाळ, हा त्रैवर्णिक द्विज, परका, पलीकडचा, तो दुसरा, हा आपला मुलगा हें उरलें कसचें तें? (९३)

अथवा ही गाय, हें कुत्रें, एक श्रेष्ठ, एक क्षुद्र, नीच असें हें असो; पण जागत्या माणसास स्वप्नांतील भास ते कसचे असणार? (९४)

येथें भेद तो ("कैं" देखावा) केव्हां पाहिला होतो, जेव्हां का अहंभाव उरला व्हावा तेव्हांच कीं व अहंभाव तो आघवा मुळींच आधींचि नाहीं, म्हणून आतां येथें विषम तें (कसचें न् काय) काय असणार? (९५).

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

इह = येथें, ह्या जगांत, आतांच कीं. जितः = जिंकला, वश केला. सर्गः = स्वभाव, उत्साह, संसार, निश्चय, त्याग, जगाची उत्पत्ति. स्थितं = निश्चित, अढळ, पूज्य, उभें, असलेलें. मनः = मन, ध्यान, बुद्धि, विचार, सुखदुःख जाणणारें इंद्रिय. निर्दोषं = निरपराधी, निर्व्यंग, बिनचूक, पुण्य, सुकृत, आरोग्य, दोष नसलेलें. (दोष = प्रदोषकाळ. निर् = निश्चय). समं = तेंच, सदृश, पूर्ण, सारखें, समोर. ब्रह्म = अध्यात्मज्ञान, ज्ञान, तत्त्व. तस्मात् = म्हणून. ब्रह्मणि = ईश्वर, परमात्मा, वेद, ओंकार, मोक्ष, अध्यात्मज्ञान, तत्त्वज्ञान, ज्ञानतत्त्व. स्थितः = उभें. साम्य = तुल्यता, समता, सादृश्य, बरोबरी.]

**अन्वय :** येषां मनः साम्ये स्थितं तैः इहैव सर्गः जितः, ब्रह्म निर्दोषं समं अस्ति, तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः ।

**अर्थ :** ज्यांचें मन पुरुषलक्षणाचें नामरूप सम्यगास आलेलें–अशा साम्यावस्थित–स्थिर झालेले, त्यांनीं ह्या प्रस्तुत देहांतच जन्ममरणाचे प्रकार जिंकले–त्यांनीं ह्या प्रस्तुत देहाचा जन्म जिंकला. ब्रह्म हें (सम) एकरूपच व पवित्र आहे म्हणून ते ज्ञानी पुरुष (साम्यरूप) ब्रह्मामध्यें स्थिर झालेले असतात (१९).

**म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म ।**
**हें संपूर्ण जाणें वर्म । समदृष्टिचें ॥ ९६ ॥**

**जिहिं विषयसंग न संडितां । इंद्रियांतें न दंडितां ।**
**परि भोगिली निःसंगता । कामेंविण ॥ ९७ ॥**

**जिहिं लोकांचेनि आधारें । लौकिकें व्यापारें ।**
**तेणें सांडिलें निदसुरें । लौकीक हें ॥ ९८ ॥**

**जैसा जनामाजि खेंचर । असतचि जना नव्हे गोचर ।**
**तैसा शरीरि परि संसार । नोळखे तयातें ॥ ९९ ॥**

**असो हे पवनाचेनि मेळें । जैसें जळीं जळ कल्लोळे ।**
**तें आणिकें म्हणति वेगळें । कल्लोळ हे ॥ १०० ॥**

**तैसें नामरूप तयाचें । येऱ्हवीं ब्रह्मचि तें साचें ।**
**मग सम्याले जयाचें । सर्वत्र गा ॥ १०१ ॥**

**ऐसेनि समदृष्टि जो होये । तया पुरुषलक्षणही आहे ।**
**अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें । श्रीअच्युत म्हणे ॥ १०२ ॥**

सर्वत्र = सर्वठिकाणीं, सर्वकाळीं सारखें. अद्वय ब्रह्म = एकचएक ब्रह्म, आपण स्वतःच कीं. जाणें = जाणी. वर्म = खुणेची गोष्ट, खूण, मर्म, जिव्हाळ्याची जागा, चिन्ह. सम = सारखें, एकच प्रमाण असलेलें. दृष्टि = पाहणें जें. समदृष्टि = समद्रष्टा, ब्रह्मभाव–संपन्नता (९६). संडितां–सांडिता = नच त्यागिता. इंद्रियांतें न दंडितां = तपश्चर्या करून. परि भोगिली निःसंगता = (निःसंग = निरासक्ति, विषयासक्तीचा अभाव, निरिच्छता, कोडगा). निस् = अभाव, बाहेर अर्थी. संग = मैत्री, विषयासक्ति, संयोग. कामेंविण = मनोरथ, इच्छेशिवाय. कामनेविण = विषयासक्ततेविण. कामेंविण = कामनेविण. काम = १) मनोभाव, मदन, इच्छा, काम. २) लालसा, अभिलाष. ३) यथाविधी स्त्रीसेवनम्–धर्म, अर्थ, काम = त्रिवर्ग. धर्म, अर्थ, काम, मोक्ष = चतुरवर्ग (९७). लौकिकें–लौकिकेंचि–व्यापारें. लौकिकेंचि = व्यावहारिक–ऐहिक, सामान्य, रूढ, प्रसिद्ध. व्यापार = उद्योग, धंदा, प्रयोग, खटपट. तेणें सांडिलें–परि सांडिलें–निदसुरें लौकीक हें. निदसुरें = अर्धे जागें, अज्ञानांत बुडालेलें, अज्ञानी, अर्धवट झोंपेंत असलेलें. लौकिक = ऐहिक (९८).

जनामाजि = लोकांमध्यें, समूहामध्यें, मनुष्यांमध्यें. खेंचर = आकाशांत फिरणारा, भूत. असतचि = असलेलाच, असूनही. नव्हे गोचर = दिसत नाहीं. शरीरि = प्राणी, देहधारी, जिवंत, जिवात्मा. परि संसार = परंतु संसार कांहीं. संसार = जन्ममरण-प्रवाह. नोळखे तयातें = त्यास ओळखित नाहीं, जाणीत नाहीं, अनुभवत नाहीं, मानीत नाहीं (९९). असो हे–हे असो : : पवनाचेनि मेळें = वायूच्या मेळामुळें, वायूच्या मिलाफानें, भेटण्यानें. जैसें जळीं–जळींचि–जळ कल्लोळे–लोळे. कल्लोळ = उल्लोळ कल्लोळ–महत् ऊर्मि. लोळे = चलाचलम्, चलम्, चंचलम्, तरलम्. जैसें जळीं जळ कल्लोळे = जळांमध्येंच जलतरंग पाण्याची लाट असते. कल्लोळ = लाटा, तरंग, ऊर्मि, विचि, भंग. ऊर्मि = भंग, तरंग, ऊर्मि, वीचि, इत्यादि. तें आणिकें–आणिकी–म्हणति वेगळें–कोणी म्हणतात हे तरंग निराळे, वेगळे असे होत (१००). तें–तो. मग–मन. सम्याले–सम्यगा आलें–साम्या आलें–समतेला आलें. [ जैसें वृक्षपण बीजासि आलें । कीं मेघ हे गगन जाले ॥ तैसें अनेकत्व जेथ सामावले । तें साम्य म्हणिपे ॥ १६९–८ ॥] साचें = खरें, साक्षात्, प्रत्यक्ष (१०१). समदृष्टि = ब्रह्मभाव, संपन्नता. पुरुष = परमात्मा, जीव, पुरुष, मनुष्य. लक्षण = नांव, खूण, व्याख्या. [ लक्षण = वाच्यार्थाहून निराळा, पण त्याला सोडून नसलेला अर्थ ] (१०२).

म्हणून सर्वठिकाणीं सर्वकाळीं सारखें, आपण एकच एक ब्रह्म हीच समदृष्टि–समदृष्ट्या ब्रह्मभावसंपन्नाची खूण समज. (९६)

त्यांनीं, ज्यांनीं विषयसंग न सांडितां, इंद्रियांना न दंडितां, कामेंवीणच कीं निःसंगता भोगिली. (९७)

ज्यांनीं लोकांच्या आधारानें, लौकिक व्यापारानें, लौकिकाचें असें तें सोडलें, सांडलें, टाकून दिलें. (९८)

जसा जनांमध्यें–खेचरति असौ–खेचर असलेला, तो जनांस दिसत नाहीं, गोचर होत नाहीं, तसा शरीरि जरी, तरी पण संसार कांहीं त्यास ओळखित नाहीं. (९९)

वाऱ्याचे आश्रयानें जसें पाण्यामध्येंच पाणी कल्लोळाचें होतें, तेथें तर आणीक दुसरे वेगळे असे ते कल्लोळ म्हटले होत. (१००)

तसें नामरूप त्याचें तें पाहिलें असतां तें ब्रह्मच कीं साचें असें व यावरच कीं, सर्वत्र त्याचें सम्यकतेस आलेलें ब्रह्मच कीं– (१०१)

अशा समदृष्टीनें जो असतो, त्यास पुरुषलक्षणेंही आहेत. श्रीअच्युत म्हणतात—अर्जुना, तीं संक्षेपतः सांगण्याचें करतों. (१०२)

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

[ न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य = (हृष् + प्र = प्रोत्साहन देणें). हृष् = खोटें बोलणें, संतुष्ट होणें, उल्हास पावणें. प्रिय = आवडतें, सुखकर, इष्ट गोष्ट, प्रीति, सुखवार्ता. न उद्विजेत् प्राप्य च अप्रियम् = (विज + उत् = दुःख

पावणें, खेद मानणें, कंटाळणें, त्रासणें, पाडणें, छळणें, भिवविणें, वीट आणणें.) अप्रियम् = न आवडणारें, प्रतिकूल; प्रतिकूल वर्तन. स्थिरबुद्धि = निश्चल, निश्चयी जाणीव, विवेक, हेतु, ज्ञानशक्ति. असंमूढः = (संमोहः = भ्रांति) बावरलेलें, संशयग्रस्त. ब्रह्मवित् = वेदांती. ब्रह्मणि = ब्रह्मसत्त्वांमध्यें. स्थितः = उभा, हजर, अढळ, स्थिर, सत्यवचनी.]

**अन्वय :** प्रियं प्राप्य न प्रहृष्येत्, अप्रियं च प्राप्य न उद्विजेत्, स्थिरबुद्धिः असंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥

**अर्थ :** इंद्रियांना प्रिय वाटणारी वस्तु प्राप्त झाली असतां, त्याबद्दल हर्ष (न प्रहृष्येत्) किंवा अप्रिय वाटणारी वस्तु प्राप्त झाल्यामुळें विषाद न मानितां ब्रह्म जाणणारा मनुष्य स्थिरबुद्धि व सद्‌सद्‌विवेकाविषयीं जागा राहून ब्रह्माचे ठिकाणीं (ब्रह्मणि) स्थिर राहतो (२०).

**तरी मृगजळाचेनि पुरें। जैसे न लोटति गिरिवरें।**
**तैसा शुभाशुभिं न विकरे। पातलां जो ॥ १०३ ॥**

**तोचि तो निरुता। समदृष्टी तत्त्वतां।**
**श्रीहरि म्हणे पंडुसुता। तोचि ब्रह्म ॥ १०४ ॥**

न लोटति–न लोटिजे का = (मृगजळाच्या पुरानें पर्वत जसा) वाहून जात नाहीं, का शुभाशुभिं न विकरे = शुभ का अशुभ तेथें तो–विकाराचा होत नाहीं–विकार पावत नाहीं. पातला–पातलिया = शुभाशुभीं पावला–पातला असता, पोहोंचला असता. गिरिवर = पर्वत. विकार = मनांतील बदल. न विकरे = मन बदलत नाहीं (१०३). तोचि तो निरुता = खरा. समदृष्टी तत्त्वतां = ब्रह्मभावसंपन्न असा, तत्त्वतः म्हणजे सत्यतेनें कीं (मन का शरीरधारी असा पाहावा तो). तोचि ब्रह्म = तोच ब्रह्म होय. ब्रह्म = ज्ञानतत्त्व, ईश्वर, मोक्ष (१०४).

मृगजळाच्या पुरानें (गिरिवरें लोटलीं जात नाहींत) पर्वत जसा वाहून जात नाहीं, तसा शुभ का अशुभ पातल्यास, जो विकार पावत नाहीं, (न विकरे)– (१०३)

तोच कीं खरा, निरुती, तत्त्वदृष्ट्या समदृष्टि–ब्रह्मभावसंपन्न–म्हणावा, जाणावा–श्रीहरि म्हणतात, तोच हे पंडुसुता ब्रह्म कीं! (१०४)

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम्।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

[बाह्य = विषय–दृश्य पदार्थ विषय म्हटले, शब्द, बाहेरचे, परके, हलक्या जातीचा, बाहेरचा प्रदेश. बाह्यस्पर्शेषु (इंद्रियविषय, त्वचा, स्पर्शज्ञान–स्पर्श = 'क' पासून 'म' पर्यंत वर्ण, दान देणें, मैथुन–). असक्तात्मा = उदासीन, न गुंतलेला, आसक्ति न ठेवणारा जीवात्मा आपण जो स्वभाव जो. यत् सुखम् आत्मनि विन्दति = जें सुख स्वरूपामध्यें (आत्मनि) भोगतो, जाणतो, अनुभवतो, मानतो. स ब्रह्मयोगयुक्तात्मा = ब्रह्मामध्यें समरस झालेला, ब्रह्मभावसंपन्नतेच्या योगानें युक्त असा तो जीवात्मा. अक्षय्यम् सुखम् अश्नुते– (अश् = अनुभवणें, व्यापणें, पोंहोंचणें). अक्षय्य = अनंत, क्षय न पावणारें. (अक्षय = अविनाशी, परमात्मा). सुख = आनंद, आराम, मधुर, कल्याण.]

**अन्वय :** बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा आत्मनि यत्सुखं विन्दति, स ब्रह्मयोगयुक्तात्मा (तद्) सुखं अक्षय्यमश्नुते।

**अर्थ :** विषयेंद्रिय संयोगाचे ठिकाणीं, ज्याचें अंतःकरण असंलग्न असतें, असा ध्यानयोगी पुरुष "आत्मनि" म्हणजे आत्मस्वरूपाच्या ध्यानामध्यें जें सुख अनुभवितो, तें सुख ज्याची बुद्धि ब्रह्मयोगानें म्हणजे समत्वयोगानें संपन्न झाली आहे असा स्थिरबुद्धीचा मनुष्य स्थितिप्रज्ञत्व अक्षय्य अनुभवितो (२१).

जें आपणपें सांडुनि कहिं । इंद्रियग्रामावरि येणें नाहिं ।
तो विषय सेवि हें काई । विच्चित्र येथें ॥ १०५ ॥

सहज स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडें अंतरें ।
रचला म्हणोनि बाहियेरें । पाउ न घालि ॥ १०६ ॥

सांगें कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरण चोखटें ।
तो चकोर काय वाळवंटें । चुंबित असे ॥ १०७ ॥

तैसें आत्मसुख उपाईलें । जयासि आपणपां फावलें ।
तया विषय सहज सांडलें । सांगों काई ॥ १०८ ॥

येऱ्हवि तऱ्हि कौतुकें । विचारुनि पाहें पां निकें ।
या विषयाचेनि सुखें । झकवति कवण ॥ १०९ ॥

जे–जया. आपणपें = आत्मस्वरूपाला, स्वतःला, स्व-स्वरूपाला, आपलें स्वतःचें जें घर तेथें. तो विषय सेवि–तो विषय न सेवी = विषय सेवितो–न सेवितो. येथें–येथ. इंद्रियग्रामावरि येणें नाहिं = इंद्रियग्राम समुदाय–बाजार–आधीनतेचें होणें नाहीं; तो विषयाधीन झाला नाहीं तर तेथें नवलाचें, विचित्र म्हणजे चमत्कारिकतेचें असें कांहीं नाहीं, असें (१०५). सहज–सहजे = जातिस्वभावेंकरून, स्वाभाविक, जन्मसिद्ध, सहजासहज. स्वसुखाचेनि अपारें = स्वसुखाच्या अपारपणामुळें, पूर्णतेमुळें. सुरवाडें अंतरें–सुरवाडलेनि अंतरें = चित्त, अंतःकरण सुखमय झालें (रचिला). म्हणोनि–म्हणउनि. बाहियेरें = विषयांची भिक्षा मागण्यास बाहेर जात नाहीं. पाउ न घालि–पाऊल न घलि = पाय बाहेर ठेवीत नाहीं (१०६). चंद्रकिरण–चंद्रकिरणें = चंद्रकिरण. जेविला = सेविला, सेवितो. चोखटें = उत्तमोत्तम, चांगलीशी. चकोर = चकोर, चकोरक पक्षीविशेष. कुमुददळाचेनि ताटें = चंद्रविकासी कमलपत्राच्या पानामध्यें–ताटामध्यें. वाळवंटें चुंबित असे = वाळवंट = वाळूचे खडे–कण चुंबील, जेवील. चुंबणें (चुंबि) = हलु स्पर्शणें; चुंबन घेणें; विषयलंपटता; मुका; चुंबन. (अचुंबित = बिनचूक. ओ. ७ अ. ५). चुंबितच् = आपोआपच (१०७). आपणपां–आपणपेंचि (फावलें) = आपणच आपणास लाभलें, भेटलें, मिळालें. फावलें = मिळालें. आत्मसुख उपाईलें = ब्रह्मानंदानुभव सुख आवडतें, उत्पन्न झालें. उपाईलें = उत्पन्न झालें. जयासि–जेयासि = ज्याला. सांडलें–सांडवले = सोडले गेले–सोडवले गेले. तया–तेया = त्यास. सहज–सहजे = आपोआपच. सांगों काई–म्हणों काई (१०८). निकें = बरें. कौतुक–कवतुक = नवलाची गोष्ट. विचारुनि पाहें पां निके = [ १) (चर् + वि) हिंडणें, चुकणें, पाप करणें. २) विचार करणें, ध्यान करणें, शंका काढणें ] बरें असें विचार करणें करून पाहा. झकवति–झकविजति = फसतात, फसविले जातात. झक्–झकणें = फसणें, विस्मित होणें. सलज्जः = अधृष्टः शालीन इति. विलक्षः, विस्मयान्वितः, प्राप्ताश्चर्यस्य (१०९).

जो स्वतःस सोडून केव्हांही (इंद्रियाधीनतेचा होत नाहीं, इंद्रियसमुदायाचा होत नाहीं) इंद्रियग्रामावर येत नाहीं–तो विषय सेवन करतो, हें कसचें तें विचित्र, चमत्कारिक असें बोलणें येथें! (१०५)

सहजसुखाच्या अपारपणामुळें, पूर्णतेनें अमर्यादतेमुळें, सुख पावलेल्या, चित्त सुखमय झाल्यामुळें, मनाचा झाल्यानें, अंतःकरणाचा झाल्यानें, रचिलेला तो आणि म्हणूनच तो बाहेर पाऊल मुळींच घालीत नाहीं. विषयसुखाची माधुकरी मागणें जसें तें बाहेर गेल्याशिवाय होणें नाहीं–म्हणून तो विषयाच्या माधुकरीसाठीं बाहेर जातो कशाला? जात नाहीं! (१०६)

चंद्रविकासी कमलपत्रांच्या ताटांत, पानांत, पात्रांत जो उत्तमोत्तम चांगले चंद्रकिरण सेवनो, तो चकोर काय वाळूचे कण चुंबील? (१०७)

तसें ब्रह्मानंदसुख आवडतें असें ज्याचें स्वतःसच आपलें आपणांस लाभलें, फावलें, त्यास तर हे विषय सहज सोडले गेले, सोडवले गेले म्हणावेत काय? [तसें आत्मसुख उत्पन्न झालें, ज्याचें त्यासच प्राप्त झालें–मिळालें, त्यास विषय सहज सोडवले नच म्हणावें काय?] (१०८)

एऱ्हवीं सहज कौतुकानेंच कीं, हिताचा विचार करून पाहिल्यास, त्या विषयाच्या सुखानें ते फसविले, झकविले जाणारे ते कोण बरे असावेत? (१०९)

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

[ये हि संस्पर्शजाः भोगाः (स्पृश्+सं = शिंपडणें, तोंड धुणें. स्पृश् = स्पर्श करणें, पोंचणें, थोपटणें, परिणाम विकार करणें, कळवळा आणणें, देणें.) विषय इंद्रियस्पर्शामध्यें जे भोग आहेत. दुःख = कष्ट, त्रास, दुख. योनिः = कारण, प्रकृति, उत्पत्तिस्थान. दुःखयोनय एव ते = केवळ दुःखाला कारणीभूत होणारे भोग. आद्यंतवंतः = आदि+अंत+वंतः = आदि व अंत आहेत अशा त्या होत–असें उत्पत्ति व विनाश यांनीं युक्त, उपेक्षणीय सर्वथा. बुधः तेषु न रमते = शहाणा तेथें रमत नाहीं; रममाण होत नाहीं; आनंदाचें होणें करीत नाहीं. बुधाः = शहाणे, विद्वान. बुधान = ममताळु. कौंतेय = हे कुंतिसुता.

**अन्वय :** हि ये भोगाः संस्पर्शजा ते आद्यंतवंतः दुःखयोनयः सन्ति, हे कौंतेय, बुधः तेषु न रमते ।

**अर्थ :** संस्पर्शजा म्हणजे इंद्रियविषयाच्या संयोगानें जे उपभोग प्राप्त होतात, ते उत्पत्ति व विनाश पावणारे असतात. दुःखपरिणामी असतात. दुःखयोनीचे असतात. त्या अनित्य भोगांत–सुखोपभोगांत–उपभोगांत ज्ञानी पुरुष रमत नाहीं, रेंगाळत बसत नाहीं, त्याची पर्वा करीत नाहीं, तिकडे लक्ष देत नाहीं (२२).

**जिहिं आपणपें नाहिं देखिलें । तेचि इंद्रियार्थिं रजले ।**
**जैसे रंक पां आळुकेलें । तुषातें सवी ॥ ११० ॥**

**नातरि मृगें तृषापीडितें । संभ्रमें विसरोनि जळातें ।**
**मग तोयबुद्धि बरडीतें । ठाकूनि येति ॥ १११ ॥**

**तैसें आपणपें नाहिं दिठें । जया स्वसुखाचेनि सदा सराटे ।**
**तयासिचि विषय गोमटे । आवडति ॥ ११२ ॥**

**येऱ्हविं विषईं काय सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें नोहे ।**
**तरि विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ॥ ११३ ॥**

**सांगें वातवर्ष आतपधरें । ऐसी अभ्रछायाचि जरि सरे ।**
**तरि त्रिमाळिकें धवळारें । करावीं कीं ॥ ११४ ॥**

**म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां जल्पिजे ।**
**जैसें मुहुर कां म्हणिजे । विषकंदातें ॥ ११५ ॥**

**नातरि भोमा नाम मंगळ । रोहिणीतें म्हणति जळ ।**
**तैसा सुखप्रवाद बरळ । विषईक हा ॥ ११६ ॥**

**हे आघवी बोली । सांग पां सर्पफणिची साउलि ।**
**ते सितळ होईल केतुली । मूषकासी ॥ ११७ ॥**

जैसा अमिषकवळ पांडवा । मीन न सेवि तंवचि बरवा ।
तैसा विषयसंग आघवा । निभ्रांत जाणें ॥ ११८ ॥

हे विरक्तांचिये दृष्टीं । जैं निहाळिजे किरीटी ।
तैं पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखें दिसे ॥ ११९ ॥

म्हणोनि विषयभोगिं जें सुख । तें साद्यंत जाण दुःख ।
परि काय करिति मूर्ख । सेवितां न सरे ॥ १२० ॥

तें अंतर नेणति बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे ।
सांगें पूयपंकिंचे किडे । काय चिळसि (षि) घेती ॥ १२१ ॥

तयां दुःखियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमिंचे दर्दुर ।
ते भोगजळातें जळचर । सांडिति केवीं ॥ १२२ ॥

आणि दुःखयोनि जिया आहती । तिया निरर्थका तरि नव्हति ।
जरि विषयावरि विरक्ति । धरिती जीव ॥ १२३ ॥

नातरि गर्भवासादि संकट । कां जन्ममरणाचे कष्ट ।
हे विसांवेवीण वाट । वाहावि कवणें ॥ १२४ ॥

जरि विषईं विषय सांडिजेल । तरि महादोषि कें वसिजेल ।
आणि संसारशब्द नव्हेल । लटिका जगिं ॥ १२५ ॥

म्हणोनि (आ) अविद्याजात नाथिलें । तें तिहिंची साच दाविलें ।
जीहीं सुखबुद्धि घेतलें । विषयदुःख ॥ १२६ ॥

ययाकारणें गा सुभटा । हा विचारितां विषय चोखटा ।
तूं झणीं कहिं तया वाटा । विसरोनि जासी ॥ १२७ ॥

पैं यातें विरक्त पुरुष । त्यजिति कीं जैसें विष ।
निराशा तयां दुःख । दाविलें नावडे ॥ १२८ ॥

जिहि आपणपें नाहिं देखिले–तैसें आपणपें नाहीं दिठे=स्वतःचे (आपणपें) स्वरुप तें नाहीं दृष्टीस पडलें. तेचि तेचि ईंद्रियार्थि रजले–तेचि ईहीं ईंद्रियार्थीं रंजले–रंजले–सुखाचे झाले–. जैसे रंक पां आळुकेलें–जैसे रंक वा आळुकेलें = जसा (रंक) भिकारी भुकेनें व्याकुळ झालेला, हपापलेला (आळुकेलें). तुषातें सवी–तुषांतें सेवी = कोंडासुद्धा खातो. तुष = कोंडा, भूस. बुसं क्लीबेऽपि धान्यत्वचि तुष इति. बुस (ष) = कोंडा, भूस, रानशेणी. तुषानल = भुसाचा अग्नि. बुसी = तपस्वी लोकांचें आसन. सेवनं सीवनं स्युति इति सूचि क्रियाया. तुषान्नें = कोंड्याचीं केलेलीं अन्नें–(अन्न = अन्न, शिजवलेला भात. अन्नप्राशन = उष्टावणें). सवी × सेवी. सुत्या, अभिषवः, सवनम् इति ३. सोमाभिषवस्य–सोमरस काढणें, स्नान, अभिषेक, यज्ञ, अभिषवण (११०). नातरि = अथवा. मृगें तृषापीडितें = तहानेलेलीं हरिणें. संभ्रमें = भ्रमानें, भ्रांतीनें. विसरोनि जळातें = पाणी–जळ (देह) विसरून जाऊन. मग तोयबुद्धि = तोय–संतप्त देहबुद्धीचे होऊन–पाणी समजून. बरडीतें = माळजमिनीवर. ठाकूनि येति = हटकून येतात (१११).

जया = जयाते. सराटे–खराटे = दुष्काळ. आपणपें = स्वतःला, आत्मस्वरूपाला. दिठें = पाहिलें, अनुभविलें. तैसें आपणपें नाहिं दिठें–आवडती = स्वतःला, आत्मस्वरूपाला नाहीं पाहिलें, अनुभविलें ज्यांनीं त्यांना. स्वरूपसुख नच पाहणें, अनुभवणें जें तें दारिद्र्यच एक. त्यांना निजस्वरूपाचें–आपणच ब्रह्म असा–

स्वरूपसुख हें दुर्लभ; त्यांनाच हे विषय चांगलेपणें, सुंदर असे आवडतात (११२). काय = शारीरिक, देहसमूह, घर, ब्रह्मदेवासंबंधीं. सुख = कसचें तें सुख–का सुखी होणें जें तें आहे. हें बोलणेंचि सारिखें नोहे = असें हें विषयी सुख असणें जें तें बोलणेंच मुळीं नच बोलण्यासारखें आहे. तरी बोलणें तें बरळणेंच जसें का, कारण तें अयोग्य म्हणून. विद्युत्स्फुरणें पाहे जगामाजीं = ह्या जगामध्यें विजेच्या स्फुरण्यानें प्रकाशानें जसें पाहणें होतें, तसें तें आहे म्हणून–(११३). ऐसी–ऐसे. वात = वारा. वर्ष = पाऊस, वृष्टि. आतप = ऊन. कि–का. धरे = निवारे–निवारणारी. ऐसी अभ्रछायाचि जरि सरे = अशी अभ्राची, आभाळाची छायाच जर सरती होईल, पुरती होईल का तिजवरच जर का भागेल तर मग. त्रिमाळिकें धवळारें = तीन मजली चुनेगची घरें–वाडे किम् कारणार्थ करावींत, बांधावींत बरें–कशास करावींत तीं ! (११४).

जें बोलिजे = बोलिलें जातें. ते नेणतां गा वायां जल्पिजे = विषयसुख नच जाणून व्यर्थच कां बरळावें जसें. जल्प = बडबडणें, गोष्टी करणें, बोलणें, परमत सोडून स्वमत स्थापणें. विषकंदातें जैसें मुहुर म्हणिजे = विषासच–बचनागासच जसें मधुर म्हणणें तें. विषकंद = बचनाग. मुहुर = मधुर (११५). भोमा = पापग्रह मंगळास. मंगळ = कल्याणकारक म्हणणें. रोहिणीतें म्हणति जळ = रोहिणी नक्षत्र जें त्यास जळ म्हणतात जसें. रोहिणी = तांबडी गाय; एक नक्षत्र; नऊ वर्षांची कन्या. रोहिणीपति = चंद्र. रोहिणीसुत = बुध ग्रह. जल = जड, थंड; गाईचा गर्भाशय, (जलअंबिका = विहीर. जलइंधन = वडवानळ. जलक्रिया = तर्पण. जलईश्वर = वरुण, समुद्र. जलज = मासा, चंद्र, शेवाळ, शंख, कमळ, मोतीं. जलआगम = वर्षाऋतु). तैसा हा विषईक सुखप्रवाद बरळ (जाण) = तसा हा विषयासंबंधीं सुखप्रवाद म्हणजे बडबड होय. प्रवाद = जनापवाद, लोकवार्ता. विषईक = विषयासंबंधीं. विषयिन् = विषयासक्त (११६). हे आघवी बोली–हे असो आघवी बोली = असें हें सर्व बोली बोलणें जें असो. ते–जे. मूषकासी = उंदिर जो त्यास. सर्पफणिची साउलि = नागाची फणा–नागाच्या फणेखालची (फडीखालची) छाया, साउली ती. नागाची फणा = भोग. केतुली सितळ होईल = कसची ती शीतळ होईल म्हणावी. मूष = उंदिर, झरोका, मूस. मूषक = उंदिर, चोर. उंदिरवाहन–उंदिरअंक = गणपति. उंदिर अराति = मांजर (११७).

आघवा विषयसंग = सर्व हा विषयांचा संयोग–विषयासक्ति. निभ्रांत = निःसंशय. अमिषकवळ–मीन न सेवि तंवचि बरवा = मासा नच सेविनो तोंपर्यंतच तो चांगला बरवा असा. अमिष–आमिष = मांसाचा तुकडा (११८). निहाळिजे–न्याहाळिजे = पाहावें तो, पाहिलें असतां. विरक्तांचिये दृष्टीं = उदासीनांच्या दृष्टीनें. पंडुरोगाचिये पुष्टी सारिखें दिसे = पंडुरोगाच्या पुष्टीसारखें दिसणारें तें असतें. पुष्टी = पोषणवृद्धि. पोडुसौ (सो) पाक = बुसड (११९). सयंत–सायंत (–सद्यांत)–सायंसचि = स + आदि + अंत = पहिल्यापासून शेवटची, मुळापासून अखेरपर्यंत. सेवितां न सरे–न सेवितां न सरे = नच सेवितां नच मागें सरतो, हटतो–हट्टानें सेवितो. विषयभोगिं = (विषय = भोग्यवस्तु, पदार्थ, ज्ञानेंद्रियांचे रूपादि विषय. भोग = प्रारब्ध, नागाची फणा, सर्पाचें शरीर), विषय–उपभोग, अनुभव, सुख, रति, भोग, सोसणें (१२०). ते अंतर नेणति बापुडे = ते बिचारे तेथिलचें वर्म (अंतर) नेणती–जाणत नाहींत. अंतर = वर्म. म्हणोनि अगत्य सेवणें घडे = आणि म्हणूनच त्यांना विषय सेवणें तें अगत्यतेनें (आर्जवी जसें) अगत्य घडतेंच. सांगे पूयपंकिंचे किडे = सांग कीं पूरुची चिखल तेथचे ते किडे. काय चिळसि (घि) घेती = काय चिळसतील, किळसवाणें त्यांना केव्हांहि होणारें नव्हेंच ! (१२१).

तयां दुःखियां दुःखचि जिव्हार = त्या दुःखी असणाऱ्यांना दुःखच कीं जिव्हाळ्याचें करणें होतें–. ते विषयकर्दमिंचे दर्दुर = ते विषयरूपी चिखलांतील बेडूकच कीं. ते भोगजळातें जळचर–ते भोगजळींचे जळचर = भोगरूपी जलांमधील जलचर प्राणी होत. ते कसें बरें ते भोगजळ सोडण्या–सांडण्याचें करतील ? त्यांच्याकडून केव्हांहि तें होणेंच नाहीं ! (१२२). आणि दुःखयोनि जिया आहती–आहाती = दुःखयोनी ज्या

आहेत. तिया निरर्थका तरि नव्हति = त्या काय व्यर्थतेच्या अशा निरर्थक अशा होतील कीं जर–जरि विषयावरि विरक्ति धरिती जीव = जीव विषयाचे ठायीं विरक्ति धरून असतील तर–(१२३). नातरि गर्भवासादि संकट = गर्भवासादि संकट–तें तर. का जन्ममरणाचे–मरणींचे–कष्ट = जन्मण्याचे का मरण्याचे कष्टच–अहो, ही–हें विसांवेवीण वाट वाहावि–वाहवी कवणें = वाट विसांव्याशिवायच चालणें जें तेथें ती कोण बरें चालण्याचें करील? (१२४). जरि विषई विषय–विषयो–सांडिजेल = विषयासक्त विषय टाकील–तरि महादोषि कें वसिजेल = तर मग महादोषानें कुठें तें बसण्याचें होईल? आणि संसारशब्द–शब्द हा–नव्हेल लटिका जगिं = तसेंच शब्द जो संसार तो ह्या जगीं लटिका नच होईल कीं! (१२५).

म्हणोनि (आ) अविद्याजात नाथिलें = (मिथ्या अज्ञान अविद्या) = खोटेंच कीं अज्ञान तें पण. तें तिहींची–तिहींच–दाविलें = तें ह्या विषयांनीं खरेंच तसें तें अज्ञान होय, हें खरें करून दाखविलें. जीहीं सुखबुद्धि घेतलें विषयदुःख = ज्यांनीं का विषयदुःख सुख समजून अंगावर घेतलें (१२६). यया (या) कारणें गा सुभटा = हे सुभटा, सुवीरा, चांगल्या योध्या, या कारणास्तव. हा विचारितां विषय वोखटा = हा विषय खोटा, निंद्य, किळसवाणा असाच जर विचार करून पाहिलें तर–. तूं झणीं कहिं–कांहीं–तया (या) वाटा विसरोनि जासी–(जाशी) = या विषयाच्या मार्गास कदाचित् तूं चुकून जाशील, या वाटेला तूं कधींही चुकूनसुद्धां जाऊं नकोस (१२७). पैं यातें विरक्त पुरुष = परंतु ह्या विषयांना वैराग्ययुक्त पुरुष तर. त्यजिति कीं–का–जैसें विष = टाकतात, त्यजितात जसें कां विषच तें आहे असें समजून. निराशा तयां दुःख = निराशारूपी दुःख. दाविलें नावडे = पाहिलेलें देखील–दाविलें–त्यांना नच आवडणारें कीं! (१२८).

ज्यांनीं स्वस्वरूपास–अथवा स्वतःस पाहिलें नाहीं, तेच ह्या इंद्रियांच्या अर्थामध्यें सुखावले, रंजले, जसें का भिकारी–दरिद्रि भुकेनें हपापलेले, भुकेलेले–कोंड्याचें सेवन करतो, (आलुकेलें) कोंडासुद्धां खातो. (११०)

अथवा (हरिणें तहानेलेलीं) भ्रमानें पाण्यास विसरून जाऊन माळजमिनीसच पाणी असें मानून, तहानेलेलीं हरिणें भ्रमलीं होतात, फसतात. (१११)

ज्यानें आत्मस्वरूप पाहिलें नाहीं, अनुभविलें नाहीं, आपणच ब्रह्म, निजस्वरूप यासंबंधीं वाण, उणीव–अभाव, नेहमींच खडखडाट, त्यास हे विषय चांगले असे–सुंदर असे आवडतात–होतात. (११२)

एऱ्हवीं विषयामध्यें सुख आहे, हें बोलणें नव्हे तर बरळणें आहे. हें बोलण्यास योग्य नाहीं–बोलण्या, सारखें नाहीं–विजेच्या चमकण्यानें क्षणभरच चमकणारें, तें ह्या जगीं प्रकाशे असें कां न समजावें? (११३)

सांग वात–वारा, वर्षा–वृष्टि, आतप–उन्ह निवारण व्हावें तेथें अभ्र–छाया, ढगाची छाया–पुरती होते, निर्वाहाची होते, भागते, सरते, पुरते तर मग तीन तीन मजली चुनेगच्ची वाडे कां करावेत? (११४)

म्हणून विषयसुख जें बोलिजें–म्हणावें तें नच जाणतां, नेणतां वायांच कीं जल्पण्याचें होतें. जसें का विषकंदास, बचनागास कीं महुर, मधुर म्हणिजे! (११५)

(पापग्रह जो भौमा) मंगळ ग्रहाला नांव मंगळ, रोहिणीस म्हणती जल, तसा वैषयिक हा सुखप्रवाद बरळ होय–विषयांना सुख असें बोलणें व्यर्थ होय, बडबडीचें होय. (११६)

अशीं हीं सर्व (बोलीं) बोलणीं सर्पफणीची साउली, ती उंदिर जो त्यास किती शीतळ म्हणावी ती! (११७)

जसा अमिषकवळ (मांसाचा तुकडा), हे पांडवा! मत्स्य, मासा, मीन नच सेवी तंवच कीं बरवा तसा, विषयसंग आघवा–सर्व निभ्रांत जाण! (११८)

हें विरक्ताच्या दृष्टीनें पाहावें, न्याहाळावें तों, तें तर पंडुरोगाच्या पुष्टीसारखें–पंडुरोगाची सूज तसें दिसतें. (११९)

म्हणून विषयभोगामध्यें जें सुख मुळापासून अखेरपर्यंत दुःखच–पण अहो, मूर्ख ते सेविल्यावांचून राहत नाहींत असें ते करितात. (१२०)

ते मूर्ख अंतर म्हणजे वर्म जाणत नाहींत–आंतील वर्म ज्यांना माहीत नाहीं म्हणून अगत्यच कीं सेवणें घडतें–सांग कीं, काय पुवाच्या चिखलांतील किडे ते काय कंटाळा घेतात? चिळसीस येतात? (१२१)

त्या दुःखियांना जीवींचें सुख जिव्हाळा तो दुःखच कीं, ते विषयरूपी चिखलांमधील बेडूकच. भोगरूपी जळामधील जलच ते–देहजळींचे मासे, देहजळींचे वावरणारे ते कसें बरें (विषयोपभोगरूपी पाण्याला) सांडतील? (१२२)

दुःखयोनी ज्या त्या तर निरर्थक अशा नव्हतच, जर का जीव हे विषयासंबंधीं का वर विरक्ति धरिती–(१२३)

अथवा गर्भवासादिकांचें संकट तें, अथवा जन्मण्याचें व मरण्याचें ते कष्ट ही तर विश्रांतिवांचूनच कीं विसांवेवीण वाट कुणीं ती वाहावी–चालावी ती–(१२४)

जरि का विषई–विषयासक्तांनीं विषय सांडिला होईल तरी मग महादोषांनीं कुठें ते बसण्याचें–राहाण्याचें करावें बरें! तसेंच संसार हा शब्द ह्या जगीं लटिका नच होईल कीं, होणार नाहीं काय? (१२५)

म्हणून मुळींच नसलेलें, जें सर्व प्रकारचें अज्ञान तें तर त्यांनींच कीं वास्तविक दुःख असतां, सुख आहे अशा बुद्धीनें विषयरूप दुःख घेतलें. (१२६)

या कारणास्तव हे चांगल्या योध्या! सुवीरा! अर्जुना! विचार केल्यास हा विषय किळसवाणा, निंद्य, वमन, ओक, ओखट आहे. तूं ह्या विषयाच्या मार्गास कदाचित् चुकून जाशील हो! (१२७)

या विषयसुखास विरक्त पुरुष जसें का विषच असें समजून त्यजितात–उदासीन पुरुषांना विषयांनीं दाखविलेलें तें दुःख–विषयांपासून होणारें सुखरूपी दुःख नको असतें. (१२८)

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**

[सोढुम् = सहन करण्यास. प्राक् = पूर्वींच. शरीर = देह. विमोक्षणात् = सोडण्याचे (पूर्वींच). कामक्रोध उद्भवं वेगं = कामक्रोधापासून उद्भवलेले वेग–दुःख. शक्नोति = शकतो. स युक्तः नरः = तोच कीं नर (योग) युक्त म्हणावा कीं. स सुखी नरः = तोच पुरुष सुखी म्हणावा.]

**अन्वय :** यः शरीरविमोक्षणात् प्राक् कामक्रोधोद्भवं वेगं सोढुं इहैव शक्नोति, सः युक्तः सः सुखी नरः (अस्ति)।

**अर्थ :** शरीराचा त्याग करण्यापूर्वी जो ह्या देहांतच कामक्रोधादि विकारांचा वेग सहन करूं शकतो, तोच कर्मयोगी (युक्तः) होय व तोच सुखी पुरुष होय (२३).

**ज्ञानियाचा हन ठायीं । यांचि मात कीर नाहिं ।**
**देहीं देहभाव जिहिं । स्ववश केला ॥ १२९ ॥**

**जया बाह्याचि भाष । नेणिजे निःशेष ।**
**अंतरि सुख । एक आथी ॥ १३० ॥**

**परि तें वेगळेंपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।**
**तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोक्तेपणहि ॥ १३१ ॥**

**भोगिं अवस्था येकि उठि । ते अहंकारा अंचळें लोटी ।**
**मग सुखेंसि घे आटी । गाढेपणें ॥ १३२ ॥**

**तिये आलिंगनमेळिं । होय आपेंआप कवळि ।**
**तेथें जळ जैसें जळिं । वेगळें न दिसे ॥ १३३ ॥**

**किं आकाशिं वायु हारपे । तेथ दोन्हि हे भास लोपे ।**
**तैसें सुखचि उरे सस्वरुपें । मूर्ति तीये ॥ १३४ ॥**

**ऐसी द्वैताचि भाष जाय । मग म्हणे जन्हि येकचि होये ।**
**तरि तेथें साक्षि कवण आहे । जाणतें जें ॥ १३५ ॥**

ज्ञानियाचा हन ठायीं = ज्ञानी जे त्यांच्या ठिकाणीं. यांचि मात–मातही–कीर नाहिं = याविषयींची गोष्टच नाहीं–याविषयीं बोलणें नाहींच. देहीं देहभाव जिहिं = ज्यांनीं का देहधारी होऊनही–असूनही देहभाव टाकला व योगभाव आपलासा केला आहे. स्ववश केला ( केले ) = देहभाव स्वाधीन ठेविले आहेत–आपलेसे केले आहेत (१२९). जया–जयाते बाह्याचि भाष–भाख = बाह्य = बाह्य विषयांची भाष. भाख = गोष्ट. नेणिजे–नेणिजचि–निःशेष–निःशेख = नेणणेंच निखळपणें. अंतरि सुख = (आत्मसुख) = अंतरींचें आत्मसुख आहेच त्यांना. एक आथी = बाह्य विषयांची बुद्धि केव्हांहि निःशेषपणें, यत्किंचितही नसणारच (१३०). परि तें वेगळेंपणें भोगिजे = तथापि ते वेगळे होऊन–निराळेपणें भोगावेत. जैसें पक्षियें फळ चुंबिजे = पक्ष्यानें जसें फळच एक चुंबण्याचें जसें करणें तसें. तैसें नव्हें तेथ विसरिजे = पण तसें तें नव्हें तेथें तर भोगितेपणही विसरावेंच कीं–. भोक्तेपणहि = भोगितेपणहि–तेथें भोक्ता, भोग व भोग्यवस्तु ही त्रिपुटी नाहीं (१३१). भोगिं अवस्था येकि–एकी–उठि = आत्मभोग–अवस्था येक उठते, उभी होते. ते अहंकारा–अहंकाराचा अंचळ –अंचळें लोटी = ती अहंकाराचा अंचळ (ओचा)–पडदा दूर करते. मग सुखेंसि घे आटी (आंठी) = मग सहज-सुखानेंच की सुखाला मिठी. गाढेपणें = घट्ट देते, आलिंगन देते. (प्रमदा प्रियोत्तमाचे कंठीं मिठी घेते १३–७८६) (१३२). तिये आलिंगनमेळिं = त्या आलिंगनाच्या मेळ–मिलाफामध्यें. होय आपेंआप कवळि = (एकात्मता ) = आपेआपच एकात्मता होणारी. तेथें जळ जैसें जळिं = तेथें पाणी जसें पाण्यामध्यें. वेगळें न दिसे = वेगळें दिसणारें नच (१३३). किं–का– आकाशिं वायु–वायो–हारपे–हरपे = बायु आकाशामध्यें लोपतो–तेथ दोन्हि हे भास लोपे = तेथें आकाश व वायु अशी दोनपणाची बोलीच लोपते. तैसें सुखचि उरे सस्वरुपें –स्वरुपें = तेथें सुखच एक सुखस्वरूपानें. मूर्ति–सुरती–तीये = त्या मूर्तीमध्यें [ का (रूप खूब) सुरत प्रसंगामध्यें ] उरते (१३४). ऐसी द्वैताचि भाष–भाषा–जाय–जाये = याप्रमाणें द्वैत बोलताच येत नाहीं–. मग म्हणे–म्हणो–जन्हि–जरी–येकचि–एकचि होये = द्वैताचे बोलणें संपते व मग एकच झाले–एकच आहे असें म्हणणें केलें. तरि तेथें–तेथ–साक्षि–साक्षी कवण आहे जाणतें जें = तरी तेथें जाणतें असें जें तें साक्षी तें कवण बरें तेथें ! (१३५).

ज्ञानी जे, त्यांच्या ठिकाणीं तर ह्या विषयांची वार्ताही नाहीं. विषयाचा गंधही नाहीं. त्यांनीं देहधारी असतांना, देहांतील विकार आपल्या स्वाधीन केले आहेत. (१२९)

ज्यांना बाहेरील विषयांची भाष, अंतरीं एक सुख आहे म्हणून मुळींच निःशेष नेणीजेची. (१३०)

पण तें सुख वेगळेंपणानें भोगिलें व्हावें, जसें पक्ष्यानें फळ चुंबावें तसें, एवढेंच नव्हें, तर तेथें भोगतेपणही विसरणें होतें, व्हावें. तेथें भोक्ता, भोग व भोग्यवस्तु हीं तिन्हीं–त्रिपुटी–मावळलेली असते. (१३१)

भोगामध्यें आत्मभोगाची अवस्था उठते, ही अहंकाराचा (अंचळ) पडदा दूर लोटते–सारते, करते व मग ( धालेपणानें आंटी ) गाढेपणानें सुखाला आलिंगन देते, घट्ट मिठी मारिते. (१३२)

त्या आलिंगनाच्या आश्रयानें एकात्मकता आपोआपच आकळिली होते; तेव्हां जळ जसें जळामध्यें वेगळें दिसत नाहीं, तसें असतें. (१३३)

अथवा वायु आकाशांत हारपतो तेथें दोन्हींही भाष लोपते, तसें सुखच एक स्वरूपानें उरतें, तिथें त्या सुरती ऐक्यांत, सुरत प्रसंगाचे ठायीं, अथवा त्या सगुणाच्या ठायीं कीं– (१३४)

अशी द्वैताची भाष नाहींशी होते, व मग म्हणो जरी एकचि–एकात्मता होय. तरी तेथें साक्षी तें कवण आहे तर जाणतें जें तेंच कीं– (१३५)

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

[अन्तःसुखः = अंतःसुखी झालेला, आत्म्यामध्यें सुखी असलेला. अन्तरारामः = अन्तरात्म्यांतच ज्याला आराम आहे. अंतर्ज्योति = ज्ञानसूर्य ज्याच्या हृदयांत प्रकाशला आहे. ब्रह्मनिर्वाणं = ब्रह्मानंदामध्यें स्थिर होतो. (निर्वाण = समाधि, मोक्ष). ब्रह्मभूत = जीवन्मुक्त. अधिगच्छति = पावत असतो.

छिन्नद्वैधा = भेदबुद्धि नाहींशी झालेले. क्षीणकल्मषाः = चित्तशुद्धि झालेले. यतात्मानः = अंतःकरण शुद्धबुद्धिनियंत्रित झालेले. सर्वभूतहिते रताः = सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणाविषयीं तत्पर झालेले. ब्रह्मनिर्वाणं लभन्ते = ब्रह्मानंद प्राप्त करून घेतात.]

**अन्वय :** योऽन्तः सुखः अन्तरारामः तथा यः अन्तर्ज्योतिः सः ब्रह्मभूतः योगी ब्रह्मनिर्वाणमधिगच्छति।

**अन्वय :** ऋषयः क्षीणकल्मषाः छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ब्रह्मनिर्वाणं लभन्ते ।

**अर्थ :** अन्तःकरणांत ज्याच्या सुख आहे, व अंतरांत सुखाची बैठक आहे, त्याचप्रमाणें अंतःकरणांत ज्ञानाचा प्रकाश आहे तो योगी ब्रह्मरूप असलेला–ब्रह्माचें ठिकाणीं सुख मिळवितो (२४).

**अर्थ :** ऋषी (तत्त्ववेत्ते), पातकें नाहींशीं ज्यांचीं झालेलीं, मन ताब्यांत ठेवल्यामुळें द्वैतभाव ज्यांचा नाहींसा झाला–म्हणूनच सर्व भूतांचें कल्याण करण्याविषयीं तत्पर असलेले, ब्रह्माचे ठिकाणीं जें सुख तें ते मिळवितात–(मोक्ष मिळवितात) (२५).

**म्हणोनि असो हे आघवें । तेथें न बोलणें काय बोलावें ।**
**तें खुणचि पावेल स्वभावें । आत्माराम ॥ १३६ ॥**

**जे ऐसेनि सुखें मातले । ते आपणपांचि आपण राहिले ।**
**ते मी जाण निखळ वोतले । सामरस्याचे ॥ १३७ ॥**

**ते आनंदाचे अनुकर । सुखाचे अंकुर ।**
**किं महाबोधें विस्तार । केले जैसे ॥ १३८ ॥**

**ते विवेकाचें गांव । किं परब्रह्मींचे स्वभाव ।**
**नातरि आळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ १३९ ॥**

**ते सत्त्वाचे सात्त्विक । किं चैतन्याचे अंगिक ।**
**हें बहु असो एकेक । वाणिसी काई ॥ १४० ॥**

तूं संतस्तवनिं रचसि । तरि कथेचि से न करिसी ।
किं निराळिं देख बोलसि । सनागर ॥ १४१ ॥

परि रसातिशय मुकुळिं । मग ग्रंथार्थदीप उजळिं ।
करिं साधुहृदया राउळीं । मंगळ उखा ॥ १४२ ॥

ऐसा श्रीगुरुचा उवाईला । निवृत्तिदासासी पातला ।
मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला । तेंचि ऐका ॥ १४३ ॥

अर्जुना अनंत सुखाचा डोहीं । येकसरा तळंचि घेतला जीहीं ।
मग स्थिरावोनि तेंहि । तेंचि जाले ॥ १४४ ॥

अथवा आत्मप्रकाशें चोखें । जो आपणपेंचि विश्व देखे ।
तो देहचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ १४५ ॥

जें साचोकारें परम । ना तें अक्षर निःसीम ।
जीये गांविंचे निष्काम । अधिकारिये ॥ १४६ ॥

ते महर्षि वाटले । वीरक्तां भाग फिटले ।
जे निःसंशया पीकले । निरंतर ॥ १४७ ॥

म्हणोनि असो हे आघवें = म्हणून असें हें सर्व असो. तेथें–एथ–न बोलणें काय बोलावें = येथें नच बोलणें होणारें तें बोलावें तरी कसें, काय बोलावें तेथें. ते खुणचि–खुणाचि–पावेल स्वभावें = तें स्वभावेंकरून “आत्माराम” अशा खुणांनींच पात्रतें–पोहोंचतें–होणारें होय.– त्याची त्यालाच ती खूण पटते (१३६). जे ऐसेनि सुखें मातले = जे ह्याप्रमाणें सुखानें प्रमत्त झाले. ते आपणपांचि आपण राहिले = ते तर आपण स्वतःच आत्मरूप होऊन राहिले. ते मी जाण निखळ–निखिळ–वोतले = निखळ ब्रह्मींच समरसलेले जाणावेत कीं. सामरस्याचे = “साम्य” च ब्रह्मीं समरसलें जसें (१३७). ते आनंदाचे अनुकर–आनुकर = ते आनंदाची मूर्ति असे. सुखाचे अंकुर = सुखाचे अंकुर होत. किं महाबोधें विस्तार = अथवा ते तर–विहार–महाबोधाचे क्रीडास्थान असे–विस्तारलेले. केले जैसे = ब्रह्मव्यापकतेनें विहारच करूं आलेले–करीत असलेले (१३८). ते विवेकाचें गांव = सारासार विचार, सद्विवेकाचें तें ठिकाणच. किं–कीं परब्रह्मींचे स्वभाव = अथवा असें म्हणूं कीं परब्रह्मचि स्वभावास आलेलें. नातरि आळंकारले अवयव ब्रह्मविद्येचे = का ब्रह्मविद्याच मुळीं अलंकार परिधान करून आली आहे–असलेली कीं (१३९). ते सत्त्वाचे सात्त्विक = येथें तर सत्त्व तें सात्त्विक असें (तिही गुणांमधील सात्त्विकतेचें झालें). किं चैतन्याचे अंगिक–आंगिक = चैतन्याच्या आंगचे अवयवच. हें बहु असो एकेक–एकैक = असें हें बहुत असो, पण तेथें एक एक. वाणिसी–वानिसी–काई = असें कोठवर वानणार, वाखाणणार (१४०).

तूं संतस्तवनिं रचसि–रतसी = संतांचें स्तवन रचण्यांत–करण्यांत रत झाला आहेस. तरि कथेचि से न करिसी = तरी आठवण कथेची ती तूं नच करीत आहेस. किं निराळिं देख बोलसि–बोले देखसी–सनागर = अहो येथें निराळीच एक उत्तम बोली बोलणें होत आहे, ती म्हणजे निर्गुणाची कीं (१४१). परि–(प्रति)–परी तो–रसातिशय–रसातिशयो–मुकुळीं = पण तो रसाचा अतिशय तो आतां आवर–मुकुलित कर. मग ग्रंथार्थदीप उजळिं = व मग ग्रंथार्थदीप उजळ करण्याचा करावा. करिं साधुहृदया–हृदय–राउळीं = साधु-हृदयामध्यें मंगळ प्रभात, कल्याणकारक प्रकाश कर. मंगळ उखा = मंगल प्रभात, कल्याणकारक प्रकाश (१४२). ऐसा श्रीगुरुचा–गुरुचा–उवाईला–उवायिला = असा श्रीगुरुंचा अभिप्राय उवाइला. निवृत्तिदासासी पातला = श्रीनिवृत्तिदासांना पोहोंचला. मग तो म्हणे श्रीकृष्ण–कृष्ण बोलिला = मग ते म्हणूं लागले–श्रीकृष्ण जें कांहीं बोलिले. तेंचि ऐका–आइका = तेंच ऐका (१४३).

अर्जुना अनंत सुखाचा डोहीं = हे अर्जुना, अनंत सुखाच्या डोहामध्येंच. येकसरा-एकसरा-तळचि घेतला जीहिं = सतत-एकदम-एकसरा ज्यांनीं तळच घेतला. मग स्थिरावोनि-स्थिरावोनि-स्थिरावूनि-तेंहि = व मग त्यांनीं तेथेंच राहून-स्थिर होऊन. तेंचि जाले-जाहले = तेंच तें सुखच झाले-होऊन आहेत (१४४). अथवा आत्मप्रकाशें चोखें = अथवा चांगल्या आत्मप्रकाशानें. जो आपणपेंचि विश्व देखे = आपणच स्वतः स्वतःमध्यें विश्व पाहणें, देखणें केलें. तो देहचि-देहेचि-परब्रह्म सुखें = ह्या देहींच परब्रह्मच कीं सुखास आलें आहे. मानूं येईल = मानले जाईल, मानिले व्हावेंच (१४५). जें साचोकारें परम = जें साचोकारे-खरेपणानें खचितच. ना तें अक्षर निःसीम = एवढेंच नव्हें तर ते निस्सीम असें अक्षरच कीं. जीये गांविंचे निष्काम = अविनाशी तत्त्वाच्या गांवचे. अधिकारिये = अधिकारी कोण? (१४६). ते-जे-महर्षि वाढले = (जेवण वाढलेले जेवतात). विरक्तां भाग फिटले = विरक्तांच्या वांट्यास आलेले. जे निःसंशया पीकले = निःसंशयी जे त्यांनाच कीं पिकलेले. निरंतर = नेहमींचे (१४७).

करितां असें हें आघवें सर्व असो-जेथें बोलणेंच मुळीं नाहीं, तें बोलावें काय? अशी ही म्हणच कीं स्वभावेंकरून आत्माराम कीं तें! (१३६)

जे अशा सुखानें मातले, माजण्याचे झाले, ते स्वस्वरूपानें (आपणा स्वतःपाशींच आपण) राहिले. ते तर मी (म्हणतों) समजतों, जाण कीं, सर्व निखळ सामरस्याचे-ब्रह्मानंदाचे ओतलेले कीं, (ते ब्रह्मानंदाचे पुतळेच ओतले आहेत असें मी समजतों). (१३७)

ते आनंदाचे, सुखहर्षाचे, परब्रह्माचे आकार, अनुकार, मूर्ती, सुखाचें आसन, प्रार्थना, अंकुर, कोंभ, महाबोधानें फैलाव, विस्तार, विहार, क्रीडास्थान केलें जसें-(१३८)

ते विवेकाचे गांव का परब्रह्मींचे स्वभाव, प्रकृतीगुण अथवा ब्रह्मविद्येचे-आत्मज्ञानाचे अवयवच अलंकारलेले. (१३९)

ते सत्त्वाचे सात्त्विक, ते चैतन्याचे आंगिक, आत्म्याच्या आंगचें शरीर, अवयव, असें हें बहुत असो, एक एक, अनेक, कैक असें ते काई वानावेत-ते वर्णन करावेत-करतोस ते. (१४०)

तूं संतस्तवनामध्येंच रतत आहेस तरी मग कथेची आठवण नच करीत आहेस, कीं अथवा निराळी म्हणजे निरालंबीचे निर्गुणाविषयीं कीं एक उत्तम प्रेमयुक्त, अति चांगलें, सनागर असें देखणें देखत बोलत आहेस. (१४१)

करितां आतां तो रस आटोपता घे, संक्षेपास आण, संकुचित कर, बंद कर, मुकुलित कर, ग्रंथ-अर्थाचा दीप उज्ज्वलित कर व साधूच्या, सत्पुरुषाच्या हृदय-राउळामध्यें कल्याण कर-प्रकाश, प्रभात, उषःकाल, कर. (१४२)

असा श्रीगुरूंचा अभिप्राय उवाइला-श्रीनिवृत्तिदासांना पोहोंचला व मग ते म्हणूं लागले-श्रीकृष्ण जें कांहीं बोलिले, तेंच ऐका. (१४३)

हे अर्जुना! अनंत सुखाच्या डोहामध्येंच, सतत एकसरा एकदम ज्यांनीं तळच घेतला आहे, व मग त्यांनीं तेथेंच राहून-स्थिर होऊन-तेंच तें सुखच झाले-होऊन आहेत. (१४४)

अथवा चांगल्या आत्मप्रकाशानें ज्यानें आपणच स्वतः स्वतःमध्यें विश्व पाहणें देखणें केले तो-आकारास कैंचा ठाव-देह प्रत्यक्ष झाला देव-देहेचि ह्या (देहींच) परब्रह्मच कीं सुखास आलें आहे असें मानलें जाईल, मानिलें व्हावेंच असें आहे. (१४५)

जें साचोकारें-खरेपणानें खचितच कीं, परमश्रेष्ठ एवढेंच नव्हे तर तें निस्सीम असें अक्षरच कीं, ज्या अक्षर गांवचे, अविनाशी तत्त्वाच्या गांवचे अधिकारी कोण म्हणावेत, तर जे निष्काम-निरीच्छ ते होत. (१४६)

ते अधिकारी-अशाच महर्षींना जेवणास वाढलेले, विरक्तांच्या वांट्यास आलेले, हिश्यास आलेले, जें अविनाशी तत्त्व निःसंशयी जे, त्यानाच कीं नेहमींचें पिकलेलें असें निरंतर कीं ! (१४७)

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

[ कामक्रोधवियुक्तानां = कामक्रोधांचा वियोग झाला म्हणून. यतचेतसाम् = मन ताब्यांत ठेवता आलें. विदितात्मनाम् = ज्यांना आत्मज्ञान झालें आहे. अभितः = पूर्णपणें, (चोहोंकडून). (त्यांना ब्रह्माचे ठिकाणीं सुख असतें-ब्रह्मनिर्वाणं वर्तते) ]

**अन्वय :** कामक्रोधवियुक्तानां यतचेतसां यतीनां विदितात्मनाम् अभितः ब्रह्मनिर्वाणं वर्तते ।

**अर्थ :** कामक्रोधानें रहित असून ज्यांचें चित्त निरुद्ध झालें आहे व ज्यांनीं आत्मज्ञान संपादन केलें आहे अशा-यतचेतसाच्या (नियतचेतस्)-संन्याशी पुरुषाच्या सन्निधच ब्रह्मानंद असतो (२६).

**जिहिं विषयापासूनि हिरतलें । चित्त आपणें आपण जिंतिलें ।**
**ते निश्चित जेथले । चेतिचिना ॥ १४८ ॥**

**ते परब्रह्म निर्वाण । आत्मविदांचें कारण ।**
**तेंचि ते पुरुष जाण । पांडुकुमरा ॥ १४९ ॥**

**तें अैसें कैसेनि जालें । जें देहेंचि ब्रह्मत्वा आलें ।**
**येंही पुससी तरि भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥**

जिहिं विषयापासूनि हिरतलें = ज्यांनीं विषयांपासून चित्त हरण केलें-हिरावून घेतलें-चित्त आपणें-आपुलें आपण जिंतिले = आपले स्वाधीन ठेविलें-ते चित्तैक्यांत समरस झालेले (सुतले) पुन्हां विषयांत येत नाहींत. विषय, चित्त घेऊन जातील म्हणून जागरुक राहण्याची त्यांना आवश्यकता नाहीं. ते निश्चित जेथले-(जेथ सुतले). चेतिचिना = ते निश्चयानें जेथले (असतात तेथेंच राहतात) देहभानावर येत नाहींत (१४८). ते परब्रह्म निर्वाण-जे-आत्मविदांचें कारण = आत्मवेत्त्यांचें अंतिम साध्य-कारण तें निर्वाण परब्रह्म-. तेंचि ते पुरुष जाण = तेच ते पुरुष जाण. पांडुकुमरा = हे पांडुकुमरा (१४९). तें अैसें कैसेनि जालें = ते असे कशानें झाले ?-जें देहेंचि ब्रह्मत्वा आलें = जे देहधारी कीं ब्रह्मच स्वयंतेम आलें-येंही पुससी तरि भलें संक्षेपें सांगों = असें विचारशील तर सांगतों ऐक (१५०).

(ज्यांनीं आपलें चित्त विषयांपासून हिरतलें, हिरावून घेतलें; आपलेंच चित्त आपले आपणच ज्यांनीं जिंकलें, ते निश्चित होऊन जेथें निजले तेथून मुळीं जागेच होत नाहींत-ते निश्चयानें जेथें निजले तेथून पुन्हां उठत नाहींत, देहभानावर येत नाहींत). ज्यांनीं विषयांपासून हरण केलें, हिरावून घेतलें, चित्त आपलें स्वाधीन ठेवलें ते झोंपले-चित्तैक्यांत समरस झाले, असे ते पुन्हां विषयांत येत नाहींत. (येतीच्चिना) विषय चित्त घेऊन जातील म्हणून जागरुक राहण्याची-जागे होण्याची आवश्यकता नाहीं. (१४८)

जे परब्रह्म, शांति, मोक्ष, कैवल्यपद निर्वाण-जे आत्मविदांचे-आत्मज्ञानियांचे कारण मूळतत्त्व फल तेचि ते पुरुष जाण, हे पंडुकुमरा. (१४९)

ते असे कशानें झाले जे का ते देहींच असतांना ब्रह्मत्वास आले असें हें जरी का कांहीं पुसावेंसें वाटत असलें तर संक्षेपतः-थोडक्यांत-सारांशरूपानें सांगतों ऐक ! (१५०)

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**

[बाह्यान् = बाहेर असलेले. त्यांना-बहिः कृत्वा = बाहेर घालवून. भ्रुवोश्चैवांतरे चक्षुः कृत्वा = दोन भृकुटींच्या मध्यें दृष्टि ठेवून. नासाभ्यंतरचारिणौ = नाकाच्या आंत संचार करणारे. प्राणापानौ समौ कृत्वा = प्राण व अपान हे वायु सम करून.]

**अन्वय :** बाह्यां स्पर्शान् बहिः कृत्वा, भ्रुवोः अन्तरे चक्षुः कृत्वा, नासाभ्यन्तरचारिणौ प्राणापानौ समौ कृत्वा ······ ।

**अर्थ :** बाह्य विषय बाहेर करून, त्यांच्याशीं असलेला इंद्रियांचा संबंध तोडून दोन भुवयांच्या मध्यें दृष्टि स्थिर करून नासिकेच्या अंतर्भागीं संचार करणाऱ्या (प्राण व अपान-आंत येणाऱ्या व बाहेर जाणाऱ्या) वायूंची गति सारखी ठेवून ······ (२७).

**तरी वैराग्याचेनि आधारें । जरि विषय दवडुनि बाहिरें ।**
**शरीरिं येकंदरें । केलें मन ॥ १५१ ॥**

**सहजें तिये संधि मेटी । जेथें भ्रूपल्लवा गांठी ।**
**तेथें पाठिमोरे दृष्टी । पारुषोनियां ॥ १५२ ॥**

**सांडोनि दक्षिणवाम । प्राणापान सम ।**
**चित्तेंसि व्योम । गामिये करिती ॥ १५३ ॥**

तरी वैराग्याचेनि आधारें=वैराग्याचा आधार घेऊन, विरक्तीचें होऊन. जरि विषय दवडुनि बाहिरें = ज्यांनीं विषय बाहेर घालून. शरीरिं येकंदरें = (शरीरि=देहधारी)=एकंदर शरीरांतील. केलें मन = मनच एक सर्व असें मनाचें केलें; मन एकाग्र केलें-एकनिष्ठ केलें. शरीर म्हणजे सर्वथैव मनच एक तें आपलेंसें केलें, एकवट केलें. विषयाबद्दल तिटकारा उत्पन्न झाल्यानें ज्यांनीं विषय बाहेर हांकून लावून, मनासह सर्व इंद्रियांचें मुख्य ध्येयाशीं एकीकरण केलें-सर्व मनरूप केलें (१५१). सहजें तिये संधि मेटी = त्या मिळणीनें मेट (इडा, पिंगला, सुषुम्ना ह्या तिहींची मेट) होणारी. जेथें भ्रूपल्लवा गांठी = भ्रूपल्लवाची गांठ पडते-भिंवयांचीं टोंकें मिळतात. तेथें पाठिमोरे दृष्टी पारुषोनियां-पाउखोनियां=तेथें अग्निचक्र अथवा आज्ञाचक्रामध्येंच दृष्टि पारखून, मागें फिरवून, स्वस्वरूपीं स्थिर करतात. इडा, पिंगला, सुषुम्ना ह्यांचा मध्यसंधी म्हणजे मेट; भिंवयांचीं टोंकें मागिलीकडे अंतर्मुख फिरवून एकत्र मिळतात ते (१५२). सांडोनि दक्षिण वाम = उजवी डावी सोडून. प्राणापान सम = प्राण अपान सम करून-प्राणजय स्थिर करून. चित्तेंसि व्योम गामिये करिती = विषयरहित चित्ताला मूर्ध्नि आकाशांत नेता यावीत असें करतात; व्योमगामी चित्त करतात, विषय सोडून चित्त मूर्ध्नी-आकाशाकडे जाणारे करतात. आपणच चित्तरूप होऊन चिदाकाशांत जाणें असें करून असतात. मस्तकांत जें चिदाकाश, ब्रह्मरंध्रापुढील पोकळी, तिकडे जाण्यास योग्य करावें. इडा व पिंगळा ह्या नाड्या बंद करून-म्हणजे कुंभक करून, हृदयस्थ वायु व गुदस्थ वायु ह्यांचें ऐक्य-एकवट करणें : मनासह प्राणापानाच्या ऐक्यास-प्राणासच आकाशांत जाणारे (१५३).

तरी विषयाबद्दल तिटकारा उत्पन्न होणें जें, त्याच्या आधारानें ज्यांनीं विषय शरीराबाहेर हांकून लावून, देहाबाहेर दवडून, शरीरामध्यें मनासह सर्व इंद्रियांचें मुख्य ध्येयाशीं-एकनिष्ठलें-एकीकरण केलें-मन शरीरामध्यें एकाग्र केलें-शरीरधारीपण हें मनच सर्व करून, तें मन त्यांनीं एकाग्र केलें, त्याचें शरीराशीं एकीकरण केलें, सर्व शरीर मनरूप केलें. (१५१)

तेथें देहाच्या व मनाच्या–करार, संयोग, सख्य, संधिप्रकाश भेटीमध्यें सहज तिही म्हणजे (त्या देह व मन यांच्या संधीच्या भेटीमध्यें) इडा (उजवे नाकपुडींतील वायु), पिंगला (डावे नाकपुडींतील वायु) व सुषुम्ना इडा व पिंगला यांचे मध्य संधींत येणें, जें ह्या तीन नाड्यांच्या भेटीचें स्थान म्हणजे ज्या ठिकाणीं भ्रूपल्लवा गांठी, भिंवयांचीं टोंकें एकत्र मिळतात, तेथें दृष्टि अंतर्मुख करून–पाठीमागिलीकडे फिरवून [ जेथें भिंवयांचीं टोंकें मिळतात, त्या ललाटचक्रामध्यें दृष्टि माघारी फिरवून ] स्वस्वरूपीं स्थिर करतात. (१५२)

दक्षिण व वाम म्हणजे इडा व पिंगला ह्या नाड्या बंद करून, (प्राणायामामधील) कुंभक करून, हृदयस्थ वायु व गुदस्थ वायु यांचें ऐक्य करून–चित्तासहित मस्तकांत जें चिदाकाश–ब्रह्मरंध्रापुढील पोकळी तिकडे जाण्यास योग्य करून,–मनास मनासह प्राणापानाच्या ऐक्यास एकमेकांस इडा, पिंगला प्राणापानरूप चित्त व्योमाच्या ठायीं जाण्यास (गामिये) योग्य करितात. व्योमगामी = आकाश, (पाणी) तेथें जाण्यास योग्य केलें–करतात. (डावी, उजवी नाकपुडी सोडून प्राणजय साधतो व विषय सोडून प्राणजय चित्तासह मूर्ध्नाकाशाकडे जाणारे करतात). (१५३)

**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

[ यत्+इंद्रिय = इंद्रियें आवरलेलीं आहेत ज्यानें का ज्यांनीं. मनोबुद्धि = तसेंच मन व बुद्धिही. मुनिः मोक्षपरायणः = असा मोक्षपरायण मुनि. विगतेच्छाभयक्रोधः यः = ज्याची इच्छा विगत झाली आहे तसें काम व क्रोधही. सदा मुक्त एव सः = तो नेहमींचा–नेहमींच मुक्तच कीं. ]

**अन्वय :** यतेन्द्रियमनोबुद्धिः विगतेच्छाभयक्रोधः यः सदा मोक्षपरायणः मुनिः सः मुक्तः एव अस्ति ।

**अर्थ :** जो मोक्षपरायण मुनि–मननशील यति–इच्छा, भीति व क्रोधरहित असा, ज्याचीं इंद्रियें, मन व बुद्धि नियमित झालीं आहेत असा, सदोदित असतो; तो मुक्तच होतो (२८).

**तेथें जैसीं रथ्योदकें सकळें । घेउनि गंगा समुद्रिं मीळे ।**
**मग एकैक तें वेगळें । निवडुं न ये ॥ १५४ ॥**
**वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारुषे अर्जुना ।**
**तेथ तेवेळिं गगनिं लय मना । पवनें किजे ॥ १५५ ॥**
**जेथें संसारचित्र उमटे । तो मनोरूपु पटु फाटे ।**
**जैसा सरोवर आटे । मग प्रतिभास नाहिं ॥ १५६ ॥**
**तैसें मनपण मुदल जाये । मग अहंभावादिकें आहे ।**
**म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुवी (अनुभवी) तो ॥ १५७ ॥**

तेथें–तेथ–जैसीं रथ्योदकें सकळें = रथ्योदकें = नदीनाल्याचें पाणी–सकळें = सर्वच्या सर्व–घेऊन जासी. घेउनि गंगा समुद्रिं मीळे = गंगा समुद्रास मिळते. मग एकैक तें वेगळें = मग एकएक निरनिराळें–वेगवेगळें तें करता येत नाहीं. निवडुं न ये = निवडता येत नाहीं (१५४). तैसी वासनांतराची विवंचना–विवेचना = अनेक वासनांची जे वंचना होणारी (वासनामहत्त्व वर्णनामुळें–) विवेचनामुळें ती. विवंचना = चिंता, विचार. वंचना = फसवणूक. विवेचना = विवेक, निश्चय. मग आपैसी पारुषे–पारखे अर्जुना ( = पारखे = ) नाहींशी होते आपोआपच कीं. तेथ तेवेळिं–जे वेळिं गगनीं लय–लयो–मना पवनें किजे–कीजे = तेव्हां प्राण व अपान सम झाल्यामुळें–प्राणाचा जय झाल्यानें–तेथें निरुद्ध झालेल्या वायूनें (प्राणजयानें) मनाचा लय गगनांत म्हणजे ब्रह्मरंध्रांत करितात (१५५). जेथें–जेथ हे–संसारचित्र उमटे = हें संसाराचें चित्र ज्या (चित्त) पटावर उमटतें

तेथें. तो मनोरूपु पटु–पट–फाटे = तो मनोरूपी (पट)–वस्त्र फाटून जातें, व मग–जैसा सरोवर आटे = जसें सरोवर आटलें म्हणजे. मग प्रतिभास–प्रतिभा–नाहिं = जसें सरोवरच आटलें म्हणजे प्रतिबिंब मुळींच नाहीं असें होतें जसें (१५६). तैसें मनपण मुदल–मन एथ मुदल–जाये=तसें मनच कीं इथें मुदल असणारें जें, तेंच मुदल संपतें–नाहींसें होतें. मग अहंभावादिकें–अहंभावादिक–आहे = व मग करूवें तें अहंभावाचें असतें–होणें तें नाहींच. म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये अनुवी–अनुभवी तो = आणि म्हणूनच कीं अनुभवी जो, तो तर शरीरानेंच कीं ब्रह्मच होतो (१५७).

तेथें जशीं निरनिराळ्या रस्त्यावरील बरींवाईट उदकें घेऊन गंगा समुद्रास मिळते; व मग एक एक वेगळें वेगळें तें पाणी निवडतां येत नाहीं. (१५४)

त्याप्रमाणें वासनांतराची, इतर इच्छेची विवंचना मग आपोआपच नाहींशी होते. जेव्हां का मनाचा पवन जयानें गगनीं लय होतो. (प्राणापानरूप झालेल्या वायूनें मनाचा लय सर्व गगनांमध्यें केला जातो.) (१५५)

जेथें हें संसारचित्र उमटतें तो मनरूप पट–वस्त्र फाटून जातें; जसें सरोवर आटल्यावर मग प्रतिबिंब–प्रतिमा नाहीं. (१५६)

तसें या मार्गात, मन हें मुदल नाहींसें होतें व मग अहंभावादिक हें कोठचें कमचें उरणारें तें, म्हणून अनुभवी तो शरीरानें ब्रह्म होतो. (१५७)

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥**

[भोक्तारम् = भोक्ता जो परमात्मा. यज्ञतपसां = यज्ञाचा–तसेंच तपांचा. सर्वलोकमहेश्वरम् = सर्व लोकांचा महत् ईश्वर, परमेश्वर. सुहृदं सर्वभूतानां मां ज्ञात्वा = सुहृद्–मित्र सर्व भूतमात्रांचा जो त्यास ओळखल्यानें, जाणल्यानें. शान्तिम् ऋच्छति = शांती मिळते, शांतीप्रत पावतो, जातो–अनुभवितो.]

**अन्वय :** (मां) यज्ञतपसां भोक्तारं सर्वलोकमहेश्वरं सर्वभूतानां सुहृदं ज्ञात्वा शान्तिमृच्छति ।

**अर्थ :** परमात्मा हा यज्ञ व तप यांचा भोक्ता, सर्वसामान्य सकळ लोकांचा ईश्वर, आणि सर्व प्राणिमात्रांचा प्रिय सखा आहे; असें मला जाणतो त्याला शांति मिळते (२९).

**मागां हन सांगितलें । जे देहिचि ब्रह्मत्व पावले ।**
**ते येणें मार्गें आले । म्हणउनियां ॥ १५८ ॥**
**आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ।**
**क्रमुनि हे अपार । पातले ते ॥ १५९ ॥**
**तिहि आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप ।**
**मग साचा शांतिचें रूप । होउनि ठेले ॥ १६० ॥**
**ऐसा योगयुक्तीचा उद्देश । जेथें बोलिला श्रीहृषीकेश ।**
**तेथ अर्जुन सुदंश । म्हणोनि चमत्काराचा ॥ १६१ ॥**
**तें देखोनियां श्रीकृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें म्हणितलें ।**
**काय पां चित्त उबाइलें । ईयें बोलिं तुझें ॥ १६२ ॥**
**तव अर्जुन म्हणे देवो । परि चित्तलक्षणाचा रावो ।**
**भला जाणितला भावो । मानसा माझ्या ॥ १६३ ॥**

म्यां जें कांहीं विवरुनि पुसावें । तें आधींच जाणितलें देवें ।
तरि बोलिलें तेंचि सांगावें । विवळ करूनी ॥ १६४ ॥

येऱ्हवीं तन्हि अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसरा ।
तो पव्हणियापरिस पायउतारा । सोपा जैसा ॥ १६५ ॥

तैसा सांख्याहुनि प्रांजळा । आम्हांसारखिया अबळां ।
येथ आहे परी काळा । तो साहों ये वर ॥ १६६ ॥

म्हणोनि येक वेळ देवा । तोचि पडीताळा घ्यावा ।
विस्तारेल तरि सांगावा । साद्यंतचि ॥ १६७ ॥

तंव श्रीकृष्ण म्हणति हो कां । तुज हा मार्ग गमला नीका ।
परि काय जालें आईकीं जो कां । सुखें बोलों ॥ १६८ ॥

अर्जुना तुं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी ।
तरि आम्हांसी वाणि कायसि । सांगावयाची ॥ १६९ ॥

आधींचि चित्त मायेचें । वरि चित्त जालें पढियंतयाचें ।
आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणें ॥ १७० ॥

ते म्हणों कारुण्याची रसवृत्ति । किं नवेया स्नेहाची सृष्टि ।
हें असो नेणिजे दृष्टी । श्रीहरीचिवांचुनी ॥ १७१ ॥

जे अमृताची वोतिली । किं प्रेमचि पिउनि मातली ।
म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणें ॥ १७२ ॥

हें बहु जें जें जल्पिजेल । ते कथेसि फांक होईल ।
परि तो स्नेहरूपा न येल । बोलवन्हि ॥ १७३ ॥

म्हणउनि विसुरा काई येणें । ईश्वर आकळावा कवणें ।
जो आपलें मान नेणे । आपणचि ॥ १७४ ॥

तन्हि मागील ध्वनि आंत । मज गमला सावियाचि मोहित ।
जें बळात्कारें असें म्हणत । परिस बापा ॥ १७५ ॥

अर्जुना जेणें भेदें । तुझें किं चित्त बोधे ।
तैसतैसें विनोदें । निरूपिजैल ॥ १७६ ॥

तो काईसया नाम योग । त्याचा कवण उपयोग ।
अथवा अधिकारप्रसंग । कवण येथ ॥ १७७ ॥

ऐसें जें जें कांहीं । उत्कृष्ट असे ईये ठायीं ।
तें अवघेंचि पाहीं । सांगेन आतां ॥ १७८ ॥

चित्त देउनि अवधारिं । ऐसें म्हणोनि श्रीहरि ।
बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ॥ १७९ ॥

श्रीकृष्ण अर्जुनासि संग । वसंडुनि सांगेल योग ।
तो व्यक्त करूनि प्रसंग । म्हणे निवृत्तिदास ॥ १८० ॥

(आम्ही) मागां हन सांगितलें = मागें, मागच्या श्लोकांत तें आम्हीं सांगितलेलें असे. जे देहिंचि ब्रह्मत्व पावले = जे देहधारी असतांनाच ब्रह्मत्वास आले, शरीरेंचि ब्रह्म झाले–देही असून विदेही झाले, ब्रह्मपदास पोहोंचले. ते देणें मार्गें आले = ते ह्याच योगमार्गानें, पद्धतीनें आले. म्हणउनियां = म्हणूनच कीं (१५८). आणि यमनियमांचे डोंगर = [ यम = शरीरसाधनापेक्षां—नित्यं यत्कर्म तत् यमः. नियम = यत्कर्म आगन्तुबाह्यं साधनं नित्यं स नियमः (व्रतनियम) ] यमनियमांचे डोंगरच्या डोंगर. अभ्यासाचे सागर = ते तरी सागरच अभ्यासावे लागलेले ते. क्रमुनि ते अपार–क्रमोनि हे पार = (क्रमः = कल्पः, विधि, क्रम इति ३ नियोग–शास्त्रस्य). अपार असे क्रमूनच कीं ते पार झाले. पातले ते = पार गेले, भवाच्या पलीकडल्या तीरास चालून, आक्रमून पोहोंचले (१५९). तिहि आपणपें करूनि निर्लेप = त्यांनीं स्वतः आपणासच मुळीं निर्लेप म्हणजे उपाधिरहित करून. प्रपंचाचें घेतलें माप = प्रपंचाचें माप ते अजमावून–प्रपंच तो सर्वच्या सर्व मिथ्याच कीं असें समजून. मग साचा–साच–शांतिचे–शांतिचेंचि रूप = मग शांतीच एक खरी कीं व तिचेंच, मूर्तिमंत शांतीचें ते रूप झाले. होउनि–होऊनि ठेले = मूर्तिमंत शांतीच एका रूपास आली, असे ते होऊन राहिले (१६०).

ऐसा योगयुक्तीचा उद्देश = हेतुच कीं, योग हा कसा युक्तीचा व्हावाच असा तो. जेथें–जेथ–बोलिला श्रीहृषीकेश–हृषीकेश = जेथें श्रीहृषीकेशांनीं आतां बोलिला, सांगितला. तेथ अर्जुन सुदंश = तेथें अर्जुन हा "सुष्टु दंशः यस्य" असा मर्माला झोंबणारा. म्हणोनि चमत्काराचा–चमत्कारिला = आणि म्हणूनच कीं तो चमत्काराचा, आश्चर्याचा, देखाव्याचा असाच कीं होऊन आहे (१६१). तें देखोनियां–देखिलिया श्रीकृष्णें–कृष्णें जाणितलें = श्रीकृष्णांनीं तें पाहून जाणलें. मग हांसोनि पार्थातें म्हणितलें = व किंचित् हास्य करून पार्थास म्हटलें कीं–. काई–काय पां चित्त उवाईलें ( = प्रसन्न झालें) = काय तुझें चित्त प्रसन्नतेस आलें आहे असें झालें ना. ईयें बोलिं तुझें = ह्या माझ्या सांगण्याबोलण्यावरच कीं (१६२). तंव अर्जुन म्हणे देवो = तेथें अर्जुनानें म्हटलें कीं अहो देवा. परि–पर चित्तलक्षणाचा रावो = आपण तर श्रेष्ठ असे रावच कीं, जें का चित्त–लक्षण–मनाच्या स्वभावाचें–मनांतील गुह्य, इंगित आहांत. भला जाणितला–जी–भावो = अहो जी, आपण तर देवपणच कीं भावरूपी ह्या माझ्या इच्छेचें. मानसा–मानस माझा = ते माझ्या मनांतीलच्या, माझ्या मानसाचें रूप तें जाणलें, उमगलें. मानसभाव (मनोविकार) = इच्छा, रूप, मनोभाव, मनोविकार. संमति = मानस = गर्भित, ध्वनित भाव (१६३).

म्यां जें कांहीं विवरुनि पुसावें = (विवरुनि = उघडून, वर्णनानें, स्पष्टीकरण–व्याख्या पुसावी) = मी जें कांहीं व्याख्येच्या रूपानें करून सांगावें, असें पुसावें. तें आधींच–आधींचि–जाणितलें देवें–दवें = तों तेंच मुळीं देवांनीं अगोदरच जाणलें. तरि बोलिलें तेंचि सांगावें = व आतां मी त्यांना विनंति करीत आहे कीं, जें आपण बोललांत तेंच. विवळ करूनि = स्पष्ट कळण्यासारखें करून, स्पष्ट करून सांगण्याचें करावें (१६४). येऱ्हविं तन्हि अवधारा = येऱ्हवी तरी ठरविणें–जें निर्णय देणें. जो दाविला तुम्हीं अनुसरा–अनुसारा = तेथें जो तुम्हीं सोबती दाखविला, का पद्धत, रीत पाहण्यास सांगितली. अनुसर = सोबती, सेवक. अनुसारा = पद्धत, रीत, नियम, स्वभाव, मार्ग. तो पव्हणियापरिस–पव्हण्याहुनि–पायउतारा = ती तर खोल पाण्यामधून पोहून जाण्यापेक्षां पायउतारा जसा. सोपा–सोहपा–जसा = सोपाच कीं जसा (१६५). तैसा सांख्याहूनि प्रांजळा = कर्ममार्ग हा ज्ञानमार्गापेक्षां सोपा असल्यामुळें बरा, योग्य होय. आम्हांसारखिया–सारिखिया अबळां = आम्हा दुर्बळांना. येथ आहे–एथ आथि–परि–कांहीं–काळा = येथें ब्रह्मप्राप्ती होण्यास कांहीं काळ लागेल केव्हांही. तो साहों ये वर = पण तो आम्हीं आनंदानें सोसूं–तो लागणारा वेळ आम्हीं सोसणें तेंच बरें, आम्हांकडून तितका वेळ सोसला व्हावाच (१६६).

म्हणोनि–म्हणौनि–येक–एक–वेळ देवा = म्हणून देवा एकदां जरी. तोचि पडीताळा–पडताळा–घ्यावा–घेयावा = तो अनुभव घ्यावाच व तेथीलची ती प्रतीति. पडताळा = अनुभव, प्रतीति. विस्तारेल तरी सांगावा =

विस्तारानें, विस्तारानीं जाईल अशी. सायंतचि = सायंततेनें, आदि व अंत यांसहित संपूर्णतेनें सांगावीच (१६७). तंव श्रीकृष्ण म्हणति हो का = श्रीकृष्ण म्हणतात कीं, हे अर्जुना, असें जर आहे-तुजला हा मार्ग गमला नीका = जे का तुजला हा मार्ग हितकर वाटला तरी. परि-तरि-काय जालें-जाहलें आईकीं जो कां सुखें बोलों = तरी मग तो सहजसुखानेंच कीं सांग, बोलता व्हावा कीं-पण येथें काय कांहीं होत आहे तें ऐका! (१६८) अर्जुना तुं परिससी = अर्जुना तूं ऐकत आहेस. परिसोनि अनुष्ठिसी = (= आचारशील) = ऐकून वर अनुष्ठानाचें (= वर्तन, क्रिया, धर्मकृत्य, आरंभ, अनुसरणें, आचरणें तें) करशील, ऐकून आचरूं लागशील. तरि आम्हांसी -आम्हांसीचि-वाणि कायसी सांगावयाची = तर मग आम्हांस उणीव का हयगय सांगण्यासवरण्यासंबंधींची ती-केव्हांही नसणारच-कसची का ती. वाणि = उणीव, हयगय. वाणी = बोलणें, भाव, नाद, आवाज, स्वर, बोलण्याची शक्ति (१६९).

आधींचि-आधींच-चित्त मायेचें = आधीच आईचें चित्त-मनाची स्मृतिरूप वृत्ति, बुद्धि, मन, लक्ष. वरि चित्त-मिषें-जालें पढियंतयाचें-जाहले पढियंतयाचे = त्यांत लाडक्या मुलाचें निमित्त-जाणलेले विचार, हेतु-झाले. आतां तें अद्‌भुतपण स्नेहाचें = (स्नेह = प्रेमाचा ओलावा, कृपालु मित्राचें) अद्‌भुतपण-आश्चर्य-कारक-विस्मयोत्पादक रस, चमत्कार, आश्चर्य तें. कवण जाणें = कोणास तरी जाणता येईल काय? कोण जाणेल तें? (१७०). ते म्हणों कारुण्याची रसवृत्ति-कारुण्य रसाची वृष्टी = पूर्ण कृपेचा वर्षाव-दयेची सेवा. [ कारुण्य = दया ( करुण, करुण रस, दयार्द्र, हृदयद्रावक, दया. कारुण्यम्, करुणा, घृणा, कृपा, दया, अनुकंपा, अनुक्रोषः इति ७ करुणस्य ) ]. वृत्ति = वागणूक, वर्तन, सन्मान, सेवा, मनस्थिति, अवस्था. वृष्टि = वर्षाव, पाऊस. वृष्टिजीवन = चातक. किं नवेया-नवया-स्नेहाची सृष्टि = नव्या प्रेमाच्या ओलाव्याची सृष्टि, मूळधर्म स्वभाव. ( नव-नवेया = नवीन, कोंवळे, ताजें.-प्रत्यग, अभिनव, नव्य, नवीन, नूतन, नव, नत्न इति ७ नूतनस्य. सुकुमारम्, कोमलम्, मृदुलम्, मृदु इति ४ कोमलस्य.) स्नेह = स्निग्ध, मित्र, चंद्र, प्रेम, ओलावा. हें असो नेणिजे दृष्टी = ती दृष्टि जाणता येईना. श्रीहरीचिवांचुनी-हरीची वानूं = ती श्रीहरीची कृपादृष्टि-दर्शन-शक्ति, दिव्यज्ञान, डोळा, सूर्य, आत्मा, जगतश्चक्षु जाण-काय वर्णावी बरें! (१७१). जे अमृताची वोतिली-वोतली = निखळ अमृताची ओतीव अशी ओतलेली ती दृष्टि. किं प्रेमचि पिउनि मातली-अथवा प्रेमच कीं पिऊन मातलेली प्रमत्त अशी. प्रेम = प्रीति, स्नेह, दया, क्रीडा, आनंद. प्रेमन् = प्रेमा, प्रियता, हार्दम्, प्रेम, स्नेह इति ५ प्रेमन्. प्रेमवती = कांता, प्रिया. म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली = आणि म्हणून अर्जुनाच्या मोहामुळें गुंतली. मोह = मूर्च्छा, कश्मल, मोह इति ३ मूर्च्छायाः-. निघों नेणे = बाहेर निघूं जाणत नाहीं (१७२).

हें बहु जें जें जल्पिजेल = असें हें बहुत जें जें कांहीं बोलणें-जल्पणें. ते-तेथें-कथेसि फांक होईल = तेथें तर कथेचा फांक-विस्तारच कीं मुळीं होणारा होईल. परि तो-ते-स्नेहरूपा न येल बोलवन्हि-वरी = तरीसुद्धा ते, ते जल्पणें कांहीं त्यामुळें कांहीं ते कृष्णार्जुनाचे स्नेहास का प्रेमास येईल, जे का कितीही बोलिलें तरी तें प्रेम शब्दांनीं सांगतां येणारें होईल असें नाहीं-शब्दांनीं सांगतां येण्यासारखें होईल असें नव्हें-नच होणारें होईल कीं! (१७३). म्हणउनि-म्हणोनि विसुरा काई-काय येणें = कितीही कसेंही बोलण्याचें केलें तरी तें कांहीं स्नेहास येणारें होणारें नव्हेंच आणि-तो-ईश्वर आकळावा-कवळावा-कवणें = म्हणून आतां येथें आश्रय तो कशाचा व्हावा-शरण ते कुणास जावें-विचार तो येथें कसा बरें वर यावा, विवेक तो उपयोगाचा का उपायाचा व्हावा, ज्यायोगें ईश्वर (कुणी) कसा तो आकळावा होईल, कवळावा आलिंगावा ते-. जो आपलें-आपुलें-मान नेणें आपणचि = येथें जो आपला मान, आदर, गौरव, सन्मान, प्रमाण, महत्त्व आपण स्वतः जाणत नाहीं त्यानें कीं-. महत् विस्तीर्णस्य = विशकटम्, पृथु, बृहत्, विशालम्, पृथुलम्, महत्, वड्रम्, उरु, विपुलम् इति ९ (१७४). तन्हि-तरी-मागीला-मागील-ध्वनि-ध्वनी आंत = मागील अभिप्रायावरून (ध्वनि आंत). मज गमला साविया़चि मोहित = मला तर तो मोहित-आश्चर्य प्रेमाचें वेड-देहाला आत्मा मानणें जें-असाध्य

गमला वाटला. जें बळात्कारें असें म्हणत । परिस बापा = जें का बलात्कारेंकरूनच–जबरीनें, दांडगाईनेंच–जुलुमानें, इच्छेविरुद्ध कीं ते श्रीकृष्ण म्हणत आहेत अर्जुनास कीं, हे बापा! ऐक ऐक (१७५).

अर्जुना जेणें मेदें = अर्जुना ज्या फरकानें. मेद = फरक, अंतर, भिन्न भाव, प्रकारविशेष, व्यग्रता. तुझें किं चित्त बोधे = तुझें चित्त (मन, अंतःकरण) जाणीव घेईल, जागें होईल. बोधे = जाणीव घेईल, ज्ञानास पाहील, विचाराची बुद्धि होईल, उपदेशानें जागृती होणें, जागें करणें होईल–. तैसतैसें विनोदें निरूपिजैल = तसतसें सहज कुतूहलानें (खेळत खेळतच कीं) निरूपण करण्याचें करूं या. (विनोदें = घालविणें, परिहार, क्रीडा, मनोरंजन, शोकपरिहार, कौतुहल–खेळ इत्यादींनीं) (१७६). तो काइसया नाम–नाव योग = कशाचें तें नांव योग. तयाचा कवण उपयोग–उपेग = त्याचा उपयोग (उपेग). अथवा अधिकार प्रसंग कवण–कवणा येथ = कुणास तो अधिकार प्रसंग अथवा त्याचे जे अधिकारी (प्रसंगतेने) याविषयीं पुढील अध्यायांत निरूपण येईल (१७७).

ऐसें जें जें कांहीं = असें जें कांहीं. उत्कृष्ट–उक्त–असे ईये ठायीं = उक्त, उत्कृष्ट [ = वर जोडलेलें, उत्तम, श्रेष्ठ, जोराचे, पुष्कळ, ओढणें, ओरखडणें (कृष + उत् = वर काढणें, चित्त वेधणें, वृद्धि पावणें, फुलें तोडणें, श्रेष्ठ होणें)] का असें येथें ह्या ठिकाणीं आहे. तें अवघेंचि–आघवेंचि पाहीं = तें अवघें–आघवें–सर्व कांहीं. सांगेन आतां = सांगण्याचें करतों. उक्त = भाषितम्, उदितम्, जल्पितम्, आख्यातम्, अभिहितम्, , इत्यादि ७ उदितस्य (१७८). तूं–चित्त देउनि–देऊनि अवधारिं = हे अर्जुना, चित्त देऊन तूं ऐकण्याचें कर. ऐसें म्हणोनि श्रीहरि = असें श्रीहरीनीं म्हटलें. बोलिजेल ते पुढारी । कथा आहे = ती पुढारी कथा ते बोलणार आहेत (ती लक्ष देऊन ऐकण्याचें करावें) (१७९). श्रीकृष्ण अर्जुनासि संग = श्रीकृष्ण अर्जुनास संग [ = सग (षंग) = आच्छादणें, झांकणें]. वसंडुनि सांगेल योग = संग सांडून, व न सांडून, देहसंगती सांडून तसेंच न सांडून योग सांगतील. तो व्यक्त करूनि प्रसंग = योग सांगण्यासंबंधींचा प्रसंग असा तो व्यक्त करून. म्हणे निवृत्तिदास = निवृत्तिदास म्हणतात कीं–(१८०).

आम्हीं ह्या अध्यायांत निश्चित मार्ग सांगितले कीं देही असून विदेहीपणें ब्रह्मपदास पोंचले, ते योगी त्याच पद्धतीनें, त्याच योगमार्गानें आले म्हणून (सांगितलें) कीं– (१५८).

आणि यमनियमाचे डोंगर क्रमून तसेंच अभ्यासाचे सागर हे क्रमून, चालून, सुरू करून समर्थ झाले, पार पातले. (१५९)

त्यांनीं आपणा स्वतःस निर्लेप म्हणजे उपाधीरहित करून प्रपंचाचें माप घेतलें, व मगच खरें असें शांतीचें –जीव चिच्छक्तीचें ते स्वरूप होऊन राहिले. (१६०)

असा योगयुक्ततेचा (युक्त – युक्ति × उक्ति) अभिप्राय जेथें श्रीहृषीकेशी बोलिला आहे, तेथें अर्जुन मार्मिक सुदंश म्हणून चमत्कारास पावला–चमत्कारिला. (१६१)

हें पाहतांच श्रीकृष्णांनीं जाणलें, व मग हास्य करून पार्थास म्हणूं केलें कीं, तुझें चित्त काय उबाइलें. प्रसन्न झालें. ह्या बोलण्यानें माझ्या, देहिंच परब्रह्म झालें संबंधीच्या–. (१६२)

तेव्हां अर्जुनानें म्हणूं केलें कीं, देवा! हें परचित्त लक्षणाचे स्वामी; त्यांनीं माझ्या मानसाचा भाव (पाहा मनाचा भाव दुःस्वभाव ॥ ६७६ ॥ अ. ११) भला भला भलेपणानें जाणला. (१६३)

मी जें कांहीं विचारून, पुसावें, विचारावें, तें देवांनीं आधींच जाणलें. करितां जें कांहीं बोलिलें तेंच स्पष्ट विस्तृत करून सांगण्याचें करावें. (१६४)

येव्हवीं तरी ऐका, जो हा तुम्हीं अनुसरण्याचा मार्ग, अनुसारा दाखविला, तो खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां जसा पायउतार सोपा तसा होय. (१६५)

तसा सांख्यापेक्षां प्रांजळ, सुगम, आम्हासारख्या निर्बळांना, अबळांना येथें कांहीं योग्य असें (होणारें) करणारें आहे, पण कांहीं काळानें आनंदानें सहन करतां येईल! (१६६)

म्हणून देवा, एक वेळा तरी, तोच पडताळा, अनुभव, पर्याय सांगणें तो घ्यावा; जर विस्ताराचा होईल कां झाला, तर तोच सायंततेनें सांगण्याचा करावा कीं– (१६७)

तेव्हां श्रीकृष्णांनीं म्हणूं केलें कीं, तुझें मनोगत तसें आहे व जर तुला, हा मार्ग चांगला वाटला तर काय झालें होणारें जें कांहीं, मुखानें बोलतो तें आईकिजो कीं– (१६८)

अर्जुना! तूं ऐकत आहेस. परिसून, ऐकून अनुष्ठित आहेस; आचरत आहेस, तर मग आम्हास ते सांगावयाची कायसी ती न्यूनता मग उणीव कां बरें भासणारी? (१६९)

मूळचें अगोदरच कीं, ह्या आईचें ममतेचें चित्त, वर निमित्तच झालें कीं तें चित्त आतां पढियंतयाचें झालें, आवडतयाचें झालें, वर आतां स्नेहाचें तें अद्‌भुतपण कोण बरें जाणूं शकेल?–जाणेल तें? (१७०).

ते स्नेहाचें अद्‌भुतपण, म्हणजे अहो ते दयाळ अशी कारुण्य रसाची वृष्टीच का अथवा नव्या स्नेहाची सृष्टि, असें हें असो, पण श्रीहरीची ती दृष्टि कृपा, काय वर्णन करूं तें नेणिजे! (१७१)

ती कृपादृष्टि अमृताची ओतलेली कीं प्रेमच एक पिऊन मातलेली, माजणाची झालेली, ती काय वर्णन करूं? आणि म्हणूनच अर्जुनाच्या मोहामध्यें गुंतलेली, ती बाहेर निघूं जाणत नाहीं. (१७२)

असें हें पुष्कळसें जें जें कांहीं जल्पिजेल तेथें कथाच मुळिं विस्तार पावेल, हें शब्दांनीं बोलून दाखवितां येणार नाहीं (स्नेहरूपा न येईल बोलवरी). (१७३)

म्हणून विसुरा तात्पर्य, अभिप्राय तो कोणता कसला प्रीतिकृत् असा, प्रियकृत् असा, तेथें ईश्वर तो कुणी कवळावा, जो आपलेंच मुळीं–प्रमाण, आदर, सन्मान, विचार करणें, पूजणें तें आपण जाणत नाहीं ज्यानें कीं. (१७४)

तरी मागीलच्या, आतांपर्यंत सांगितलेल्या सूचित अभिप्रायामध्यें मला तरी सहज अकस्मात मोहित झाला आहे, असाच भासला, गमला जें का बलात्कारानेंच कीं जबरीनें, इच्छेविरुद्धच कीं, दांडगाईनें जुलमानें म्हणत आहे कीं, बापा परीस, ऐक! (१७५)

अर्जुना! ज्या ज्या प्रकारें, फरकानें, बदल होण्यानें का घेण्यानें, भिन्न भिन्न भावानें, तुझें चित्त जें का तें बोधाचें होईल, उपदेश घेईल, ज्ञानविचार बुद्धि जागृतीनें उमलेल, तसतसें विनोदेंच सहज कौतुकानें शोकाचा परिहार होईल, क्रीडेचें होईल (वेळ कुतूहलानें, उत्सुकता आनंदानें घालविणें जें) शोधाचें पाहणें जें निरूपण तें केलें जाईल. (१७६)

तो कोणत्या नांवाचा का कशास नांव योग आहे–त्याचा कवण तो उपयोग अथवा अधिकार प्रसंग तो येथें कोणता? (१७७)

असें जें जें कांहीं उक्त म्हणजे सांगितलेलें–बोललेलें भाषण, वाक्य ह्या ठाईं–ठिकाणीं तें अवघें सर्व आतां सांगण्याचें करीन. (१७८)

चित्त देऊन तो योग ऐक. त्या योगाचें विवरण पुढील अध्यायीं आहे. (१७९)

श्रीकृष्ण अर्जुनाचा सहवास न सांडतां योग सांगतील, तो प्रसंग स्पष्ट करूं, असें श्रीनिवृत्तिदासांनीं म्हटलें. (१८०)

इति श्रीगीताभावार्थदीपिकायां ज्ञानदेवविरचितायां पंचमोऽध्यायः ॥

[श्लोक २९. टीका १८०. एवम् २०९. श्रीकृष्णार्पणमस्तु ।]

इति श्रीमत् भगवद्‌गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगोनाम पंचमोऽध्यायः ॥

**॥ ॐ तत्सत् कृष्णार्पणमस्तु ॥**